॥ श्री ॥

नटसम्राट

# श्री० बालगंधर्व यांच्या नवलकथा

लेखक व प्रकाशक

**पांडुरंग गणेश क्षीरसागर**

हार्मोनियम मास्तर—पेटीचा घरचा शिक्षक,
सं. मूकनायक व वीरतनय नाटकांतील पद्यांचें नोटेशन,
गडकऱ्यांचा वाग्विलास व गडकऱ्यांचें हृदयरहस्य,
इ० पुस्तकांचा कर्ता.

**व्ही. एन्. आणि कंपनी.** ५३८ शनवार,
आप्पाबळवंत चौक पुणें २.

मार्च १९३५

**किंमत १ रुपया**



प्रि. प्र. के. अत्रे, बी. ए. बी. टी. टी. डी. ( लंडन ).

मुद्रक—गणेश जिवाजी करमरकर, रामेश्वर प्रिंटिंग प्रेस,
पेठ–रविवार १५१–१५२ विष्णुपुरा पुणें. ( पान ४९ ते ६४ छापलीं )

मुद्रक—ना० ब० चव्हाण, हरीहर प्रेस, पुणें. २
( १ ते २४ पानें छापलीं )

मुद्रक—शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस,
१०२६ सदाशिव पेठ, पुणें नं. २.
( प्रास्ताविक १२ पानें व २५ ते ४८ त्याचप्रमाणें ६५ ते ९४ व
जाहिरातींचीं ४ पानें ).

नटसम्राट

# श्रीयुत बालगंधर्व यांच्या नवलकथा

---

( सर्व हक्क लेखकाच्या स्वाधीन )

गडकऱ्यांचा वाग्विलास

व

नटसम्राट श्रीयुत

**बालगंधर्वांच्या नवलकथा**

इ० पुस्तकांच्या दुसऱ्या आवृत्तीचे सर्व हक्क
सौ० रूक्मिणीबाई क्षीरसागर
यांचेकडे आहेत.

प्रकाशक—पांडुरंग गणेश क्षीरसागर, ९२ बुधवार, पुणें.

मुद्रक—शं. न. जोशी, चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव, पेठ पुणें २.

# हें तरी नवलच !

श्री. पांडुरंग गणेश क्षीरसागर यांनीं लिहिलेल्या " बालगंधर्वांच्या नवलकथा " या पुस्तकाला प्रस्तावनेची जरुरी भासावी हें एक नवलच होय ! बोलूनचालून या नवलकथा ! यांतलि नवलाई केव्हांही चित्ताकर्षकच असणार. शिवाय ज्या थोर ' पुरुषाच्या ' या नवलकथा आहेत ते श्री. बालगंधर्व, यांस नवलपुरुष ( Wonder Man ) मानण्यांत येतें. महाराष्ट्रांत गेल्या पन्नास वर्षांत जे कांहीं नवल–पुरुष होऊन गेले त्यांत श्री. बालगंधर्वांची गणना करण्यास मुळींच हरकत नाहीं. त्यांच्या त्या रंगभूमीवरील स्त्रीभूमिका नवलाईच्या मानल्या जातात यांत कांहींच आश्चर्य नाहीं. पण ही मात्र खचित नवलाची गोष्ट आहे कीं, रंगभूमिबाहेरील त्यांच्या खासगी व सार्वजनिक जीवनाच्या गोष्टी लोकांना नवलाईच्या वाटतात ! त्यांचें बोलणें नवलाईचें, त्यांचें चालणें नवलाईचें, त्यांचें खाणें नवलाईचें आणि त्यांचें पिणेंही नवलाईचेंच ! ते प्रेमळपणानें बोलतात, सरळपणानें चालतात, सात्विक अन्न खातात आणि मोसुंब्याचा रस पितात. अशा त्यांच्या कहाण्या ऐकत असतांना श्रोत्यांचें चित्त रंगून जातें, ही गोष्ट पुष्कळांच्या परिचयाचीच असेल. स्त्रीपार्टी नटांत तर त्यांनीं नवलपुरुष म्हणून अपूर्व कीर्ति मिळविलेली आहे.

अशा नवल–पुरुषाच्या नवलकथा वाचण्याविषयीं प्रेमळ वाचकवर्ग उत्सुक झाला असेल याबद्दल तिळमात्र शंका नाहीं. या नवलकथा तशाच अत्यंत नवलपूर्ण आहेत.

श्री. क्षीरसागर यांनीं सदर पुस्तकाची अशीः कांहीं मजेदार जुळणी केली आहे कीं, त्यांतील नवलकथा वाचीत असतांना वाचकाच्या नजरेपुढें बालगंधर्वांच्या आयुष्यांतील सर्व प्रसंगाचा चित्रपट भूमिमंत उभा रहातो. बालगंधर्वांच्या चरित्राचें नवलपूर्ण सार म्हणजेच हें पुस्तक होय, असेंही म्हणावयास हरकत नाहीं.

हें पुस्तक वाचीत असतांना जी एक गोष्ट वाचकाच्या मनावर निर्विवादपणें ठसते ती ही कीं, हा नवल–पुरुष अत्यंत भाग्यशाली आहे. किर्लोस्कर संगीत मंडळींत जाण्याविषयीं त्यांना ज्यांनीं प्रोत्साहन दिले ते कै. श्री-शाहू छत्रपति होत ! त्यांनीं ज्यांना " बालगंधर्व " ही पदवी दिली ते

लो० बाळ गंगाधर टिळक होत ! ज्या शहरांत त्यांनीं रंगभूमीवर प्रथम प्रवेश केला तें शहर मिरज संस्थानची राजधानी होय ! त्यांना पुढें ज्यांनीं राजाश्रय दिला ते बडोद्याचे अधिपति श्रीसयाजीराव महाराज होत ! आणि आतां त्यांच्या सहकारितेनें ते सिनेमांच्या पांढऱ्या पडद्यावर पदार्पण करीत आहेत ते अखिल हिंदुस्थानांत श्रेष्ठ प्रतीचे कलावंत म्हणून गाजत असलेले प्रभात फिल्म कंपनीचे संचालक होत ! बालगंधर्वांच्या आयुष्यांतील हे सर्व पुण्ययोग त्यांच्या सद्भाग्याचीच साक्ष देतात. अशा भाग्यशाली पुरुषाच्या या नवलकथा वाचीत असतांना वाचकवर्ग तल्लीन झाला तर त्यांत मुळींच नवल नाहीं.

या पुस्तकांत अनेक नवलकथा आहेत. पण त्यांतल्या त्यांत पान २३ आणि २४ वर श्री.क्षीरसागर यांनीं जी एक नवलपूर्ण सत्यकथा सांगितली आहे, ती आमच्या दृष्टीनें इतकी नवलाची आहे कीं, त्या एका कथेमुळें सुद्धां हें पुस्तक महाराष्ट्रीयांच्या चिरस्मरणांत राहिल्यांशिवाय रहाणार नाहीं. किर्लोस्कर मंडळीच्या रंगभूमविर गुप्तमंजुष नाटकांत नायिकेची पहिली भूमिका श्री. बालगंधर्वांनीं मिरज मुक्कामीं केली. त्या प्रयोगास श्री शाहू छत्रपति महाराज हजर होते. त्या वेळचें लो० टिळकांच्या आगमनाचें जें वर्णन श्री. क्षीरसागर यांनीं केलें आहे तें त्यांच्या थोर चरित्राला उज्वलता आणून देणारें आहे. लो० टिळकांनीं त्या प्रसंगीं श्री. छत्रपतींशीं जें वर्तन केलें तें त्यांच्या मनाचा थोरपणाचा व्यक्त करतें. हें वर्णन छत्रपतिसरकार आणि लो० टिळक या दोघांच्याही भक्तांनीं वाचण्यासारखें आहे, इतकेंच नव्हे तर मनन करण्यासारखेंही आहे. त्या दोन थोर पुरुषांची त्या वेळची एकमेकांशीं झालेली वागणूक महाराष्ट्राच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखीच झालेली आहे. या एका नवलकथेमुळें त्या दोन थोर पुरुषांच्या जीवनक्रमावर अत्यंत उज्वल असा प्रकाश पडल्याशिवाय रहात नाहीं. माझ्या मतें या एका गोष्टीमुळें सुद्धां बालगंधर्वांच्या नवलकथांनाही विशेष महत्त्व आल्याशिवाय राहणार नाहीं.

२७ पानावर श्री. क्षीरसागर यांनीं जी मामांची हकिगत दिली आहे, ती ही अत्यंत चमत्कृतिजनक आहे. माझे मित्र प्रिन्सिपॉल अत्रे यांनीं एका सुप्रसिद्ध व्याख्यानांत पुराणकाळापासून चालू काळापर्यंतच्या अनेक मामांची मालिका सांगून

ही गोष्ट सिद्ध करून दाखविली होती. श्री. क्षीरसागर यांनीं या पुस्तकांत सांगितलेली मामाची हकिगत वरील सिद्धान्तच पुनः एकदां सिद्ध करून देते. ही मामाच्या भानगडीची हकिकत इतकी नवलपूर्ण आहे कीं,... पण नको !

( ६ ) अशा एकेक नवलकथांचें वर्णन करीत बसलें, तर प्रस्तावनेचें पुस्तक होईल आणि श्री. क्षीरसागर यांनीं लिहिलेलें छोटेखानी पुस्तक प्रस्तावनेसारखें भासूं लागेल ! अशा या सकारण भीतीमुळें आणखी विस्तार न करतां ही प्रस्तावना थोडक्यांत आटोपती घेणें आवश्यक होय !

बालगंधर्वांच्या गोड गळ्यांतून निघणाऱ्या पदांत ' नका टाकूनि जाउ डावा डोळा पाण्यानें भाझा भरला, ' हें लावणीगीत त्यांच्या अगदीं लहानपणापासूनच अत्यंत लोकप्रिय असल्याचें श्री. क्षीर-सागर सांगतात. श्री. बालगंधर्वांनीं आपल्या गोड गळ्यानें गाइलेलें हें लावणीगीत रसिकांच्या कानांत अजूनही घुमत आहे. परंतु परवां नुक-तीच त्यांनीं जेव्हां छत्रपतींच्या राजधानींत महाराष्ट्रीय रंगभूमीची रजा घेतली त्या वेळीं आखिल महाराष्ट्रांतून ' नका टाकूनि जाऊं ' अशा तऱ्हेचे गीतध्वनि स्पष्टपणें दुमदुमून गेले ! हा इतिहास अगदीं ताजा अस-ल्यामुळें त्याचा विस्तार करण्याचें कारणच नाहीं. प्रस्तावना संपवितांना रसिकांतर्फे बालगंधर्वास एवढीच विनंति करावयाची कीं, सिनेमांत तरी या पण रसिकांना टाकून जाऊं नका!

श्री. क्षीरसागर यांनीं हार्मोनियममास्तर आणि नट या दोन्हीं दृष्टींनीं महाराष्ट्रीय रंगभूमीची सेवा केलेलीच आहे. त्याशिवाय त्यांनीं हार्मोनियम मास्तर, ' पेटीचा घरचा शिक्षक ' आणि ' गडकऱ्यांचा वाग्विलास ' हीं पुस्तकें लिहून लेखक म्हणून चांगली कीर्ति मिळविलेली आहे. त्यांच्या या कीर्तींत या नवलकथांच्या पुस्तकानें नवलाईची भर पडो, असें मी इच्छितों.

निर्भीड ऑफिस,<br>मुंबई नं. ४<br>१३।३।३५

अनंत हरी गद्रे

# लेखकाचें हृद्गत

गडकऱ्यांचा वाग्विलास हें पुस्तक लोकप्रिय होऊन मध्यप्रांत व वऱ्हाड शाळा-खात्यानें हायस्कूल, मिड्लस्कूल व नॉर्मल स्कूल यांत बक्षिसें व लायब्ररीकरितां मंजूर केलें. या अल्प यशामुळें व माझ्या नाट्यकलेच्या तीस वर्षांच्या अनुभवामुळें मी प्रस्तुत ' बालगंधर्वांच्या नवलकथा ' हें पुस्तक कांहीं विद्वान् व नाट्यप्रेमी सद्गृहस्थांच्या सूचनेमुळें लिहिण्यास प्रवृत्त झालों.

स्वानुभव व दादा काटदरे वगैरेंच्या माहिती पुरविण्याच्या मदतीमुळें मला नवलकथा पूर्ण करतां आल्या. पुष्कळ लोकांनीं आगाऊ मदत केली, पण अनेक अपरिहार्य अडचणींमुळें सदर पुस्तक २–२॥ वर्षें प्रसिद्ध होण्याचा योगच येईना.

श्रीयुत अनंत हरि गद्रे यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन प्रस्तावना लिहिली.

श्रीयुत प्र. के. अत्रे बी.ए. बी. टी. टी. डी. (लंडन) यांनीं व ' नवाकाळ ' पत्रांनीं अगाऊ अभिपाय प्रसिद्ध केला याबद्दल व श्रीयुत अत्रे आणि श्रीयुत वसन्तराव मराठे यांनीं सदर पुस्तकाचा प्रुफें तपासणें वं शाब्दिक व इतर कांहीं दुरुस्त्या करणें यांत आपला अमूल्य वेळ खर्च केला याबद्दल मी त्यांचा फार फार आभारी आहे. श्रीयुत बालगंधर्वांना मी नवलकथा लिहीत आहे हें कळविलें व श्रीयुत अत्रे यांनींही प्रत्यक्ष कळविलें असतां, श्रीयुत बालगंधर्व व श्रीयुत बापुराव राजहंस यांनीं सकौतुक समाधान व्यक्त केलें. याबद्दल त्यांचेंही फारच आभार आहेत.

श्रीयुत बाबुराव देशमुख, श्रीमंत चिटणीससाहेब, श्री. ओगले [ संपादक-महाराष्ट्र ] श्रीयुत माडखोलकर [ उपसंपादक–महाराष्ट्र ] प्रो. वेदरे, श्री. नेरकर, श्री. वाशीमकर, श्री. जाधवसाहेब, श्री. यादवराव देशमुख इ० नागपूर येथील तसेंच पुणें येथील श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार, श्री. सरदार विंचुरकर, श्री. सरदार पुरंदरे, फर्ग्यूसन कॉलेजचे प्रो. चाफेकर, प्रो. समर्थ

प्रिन्सिपॉल महाजनी, सर परशरामभाऊ कॉलेजचे व्हाइ० प्रिन्सिपॉल डॉ० भागवत, प्रो. कर्वे, त्याचप्रमाणें दोन्ही कॉलेजचे कांहीं विद्यार्थी, प्रभात फिल्म कं. चे मालक व म्युझिक डायरेक्टर श्रीयुत माईणकर वगैरेंनीं अगाऊ मदत केल्यामुळेंच पुष्कळच मदत झाली परंतु अपरिहार्य अडचणींमुळें शेवटीं पुणें येथील श्रीयुत दुर्गाप्रसाद मोदी ( पेढेवाले ) यांनीं धांव घेतली म्हणूनच सदर पुस्तक वाचकांच्या हातीं देण्यास मी समर्थ झालों. याबद्दल श्री. मोदी यांचे मी आभार मानतों. श्रीयुत राजाध्यक्ष फोटोग्राफर ( मुंबईच्या रेक्स फोटो स्टुडिओचे मालक) यांनीं सदर पुस्तकाच्या कव्हरपेजवर छापण्याकरितां बालगंधर्वांच्या फोटोचें सुंदर डिझाईन व सुंदर ब्लॉक करून कव्हर दोन रंगांत छापूनदेण्याचा सर्वच खर्च केला; सुमारें ३५ रुपयांची मदत केली. श्री. राजाधक्षाच्या वेळो-वेळींच्या उदार सहाय्यामुळें मी निरंतरच त्यांचा आभारी आहे.

श्रीयुत बाबुराव नाईक यांनीं माझ्या विनंतीवरून फारच सुंदर अशी हस्तलिखित प्रत लिहून दिली, याबद्दल त्यांचेही आभार मानणें जरूर आहे.

चित्रशाळा प्रेसच्या मालकांनीं संपूर्ण काम केलें व हरीहर व रामकृष्ण प्रेसनें थोडीं थोडीं कामें करून दिलीं म्हणून त्यांचे आभार मानून व सर्वसाक्षी दयाळू परमेश्वराची दया सदैव असावी अशी इच्छा करून हें हृद्गत आटोपतें घेतों.

ज्यांनीं ज्यांनीं आगाऊ मदत केली ते सर्वच मला सारखे पूज्य आहेत. प्रत्येकाचा नामनिर्देश करणें पुस्तकाच्या दृष्टीनें उचित नाहीं. म्हणून सर्वांनीं माझ्यावर प्रेम ठेवावें एवढीच विनंती करून व सर्वसाक्षी दयाळु परमेश्वराचे उपकार मानून प्रस्तुत ' **हृद्गत** ' मी जास्त न लांबवितां आवरतें घेतों.

**पां. ग. क्षीरसागर**

*

# ' बालगंधर्वांच्या नवलकथा '

## श्री. अत्रे यांचा अभिप्राय

सुप्रसिद्ध साहित्यिक व नाटककार श्री. प्र. के. अत्रे हे म्हणतात कीं, रा. पां. ग. क्षीरसागर यांनीं गेल्या पंचवीस वर्षांत निरनिराळ्या महाराष्ट्रिय नाटक कंपन्यांतून पेटीवादक, नट, मालक इत्यादि निरनिराळ्या नात्यांनीं जितका नाट्यविषयक, विविध व बहुमोल अनुभव मिळविला आहे तितका इतर नटांनीं क्वचित मिळविला असेल. रा. क्षीरसागर म्हणजे थोडक्यांत महाराष्ट्रीय नाटकाचा ज्ञानकोश आहे, असें म्हटलें तरी चालेल. सामान्य माणसाच्या संसाराचें चित्र रंगभूमीवर पडद्याच्यापुढें नाट्यरूपानें दाखविलें जातें पण त्या पडद्याच्या पलीकडील नटांच्या आयुष्याचीं चित्रें कोणत्याही नाटकांतून व्यक्त होणें शक्य नाहीं. या अव्यक्त नटसृष्टींतील आपले अद्भुत व मनोरंजक अनुभव रा. पांडोबा जेव्हां सांगत असतात तेव्हां आपण नटांचे अरेबिअन् नाईटस ऐकतों कीं काय, असा आपणांस भास होतो. व्यापक व विविध अनुभव, सूक्ष्म व मार्मिक निरीक्षण व विनोदबुद्धि एवढ्या भांडवलावर विशेष शिक्षण अगर लेखनाभ्यास नसतांहि रा. पांडोबांनीं या विषयावर लिहिण्याचा अधिकार मिळविला आहे. या बाबतींत त्यांनीं दाखविलेली कळकळ व चिकाटी प्रसंशनीय आहे. या पूर्वी त्यांनीं प्रसिद्ध केलेलें, 'गडकऱ्यांचा वाग्विलास' हें पुस्तक किती मार्मिक व मनोरंजक आहे हें पुष्कळांना ठाऊक असेलच. त्याच धर्तीवर त्यांनीं एक ' बालगंधर्वांच्या नवलकथा ' या नांवाचें पुस्तक लिहिलेलें असून तें हल्लीं छापत आहे. बालगंधर्व हा विषय महाराष्ट्रीयांचा अत्यंत आवडता व जिव्हाळ्याचा आहे. आपल्या मधुर कामानें रा. बालगंधर्व यांनीं मराठी जनतेला गेलीं दोन तपें इतकें मंत्रमुग्ध करून टाकलेलें आहे कीं, गेल्या पंचवीस वर्षांच्या नाट्यकलेच्या इतिहासांतून बालगंधर्वांना उणें करणें म्हणजे बाकी पूज्य होतें, असेंच समीकरण आहे असें लोक समजतात. बालगंधर्वांच्या गोष्टी बोलणें व ऐकणें, त्यांचे दर्शन रंगभूमीवर व इतरत्र शक्य तितक्या वेळां घेणें, त्यांचें वेगवेगळे फोटो जमविणें व त्यांनीं गृहें शृंगारणें हा महाराष्ट्रांतील अनेक लोकांचा प्रिय व्यवसाय आहे.

स्वतःच्या हयातींत आख्यायिका व दंतकथेचा विषय होऊन बसण्याचें थोर भाग्य बालगंधर्वांनीं मिळविलें आहे. रा. पांडोबांसारख्या प्रेमळ व भाविक भक्तांच्या चष्म्यांतून बालगंधर्वांचें दर्शन तर अधिकच कमनीय दिसत आहे. इतक्या आपुलकीच्या व जिव्हाळ्याच्या भावनेनें बालगंधर्वांच्या आयुष्याचीं शब्दचित्रें इतरत्र रेखाटलेलीं माझ्या अवलोकनांत नाहींत. सदर पुस्तक मी बारकाईनें वाचलेलें आहे व त्यांत थोड्याश्या शाब्दिक दुरुस्त्याहि केलेल्या आहेत. मला स्वतः हें पुस्तक फार मनोरंजक वाटतें. बालगंधर्वप्रेमी जनता रा. पांडोबाच्या प्रयत्नाचें कोडकौतुक करील, याविषयीं मला बिलकूल शंका वाटत नाहीं. तथापि लोकांस मीं हें आगाऊ अभिप्रायादाखल जाहीर करीत आहे.

## मुंबईच्या 'नवाकाळ'चा अभिप्राय

सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय नटश्रेष्ठ श्री. नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व यांच्या चरित्राच्या कथा श्री. क्षीरसागर यांनीं बालगंधर्वांच्या नवलकथा या नांवानें एकत्र छापल्या असून त्यांची एक प्रत आम्हांस आगाऊ दाखविण्यांत आली. या चरित्रकथांच्या प्रारंभीं थोडक्यांत अर्वाचीन मराठी रंगभूमीचा इतिहास देऊन तिच्यांत पुढें किर्लोस्कर नाटकमंडळीनें घडवून आणलेली क्रांति वर्णिली आहे. त्यानंतर बालगंधर्वांचा या नाटकमंडळींत कसा प्रवेश झाला, बालगंधर्वांनीं नाट्यकलेंत कोणत्या सुधारणा केल्या, वगैरे माहितीबरोबरच श्री. क्षीरसागर यांनीं बालगंधर्वांच्या अनुभवाच्या व स्वभावाच्या ज्या कित्येक कथा दिल्या आहेत, त्या खरोखरीच नवलकथा वाटण्याजोग्या आहेत. नट किंवा एका नाटकमंडळीचे मालक या नात्यानें केवळ सार्वजनिक रीत्या येणाऱ्या संबंधांत बालगंधर्वांच्या स्वभावाच्या ज्या खांचाखोंचा सामान्य माणसाला कळणार नाहींत, त्या श्री. क्षीरसागर यांच्या, बालगंधर्वांच्या प्रत्यक्ष सहवासांत ते कित्येक वर्षें राहिल्यामुळें, ध्यानांत आल्या व त्यांचेच त्यांनीं या पुस्तकांत मोठ्या भक्तीनें संकलन केलें असल्यामुळें त्यांचें प्रस्तुत नवलकथा हें पुस्तक चटकदार वठलें आहे. मराठी भाषेंत थोर पुरुषांच्या चरित्रांचीं साधनें जुळविण्याची प्रथा एक दोन अपवाद सोडल्यास कमीच आहे. असामान्य कर्तृत्वाच्या राजकारणी

पुरुषांच्या चरित्रांकडे सामान्यतः लोकांचें लक्ष असतें, परंतु समाजसेवेच्या इतर कर्तृत्वक्षेत्रांत गाजणाऱ्या व्यक्तींच्या चरित्रांविषयीं प्रायः उपेक्षाच आढळते. रंगभूमीचें क्षेत्र अशा उपेक्षेंत सांपडल्यामुळें त्या क्षेत्रांतील अग्रणींच्या जीवनकथा मराठी भाषेंत फारशा उपलब्ध नाहींत. श्री. क्षीरसागर यांनीं केलेला हा उपक्रम या दृष्टीनें कांहींसा अपूर्व आहे व म्हणूनच त्यास भरपूर लोकाश्रय मिळेल असा भरंवसा वाटतो. कर्तृत्वाचा पेशा कोणत्याहि प्रकारचा असला तरी मनुष्याच्या स्वभावाची उपजत धीरोदात्त ठेवण या पेशामुळें बदलत नाहीं, उलट त्या ठेवणीमुळें तो पेशा उंचावतो. अशा प्रकारचा बोध या नवलकथांतून सांठविलेला मर्मज्ञांना आढळेल व ते श्री. क्षीरसागर यांच्या प्रस्तुत उद्योगाचें कौतुक करतील.

---


# सुवासिक उदबत्त्यांचा जंगी कारखाना.

पत्ता—देवल ॲन्ड सन्स्

पेठ सदाशिव-हौदाजवळ, पुणें शहर.

विक्रीस तयार ) ते दिवस गेले ! ( विक्रीस तयार

शिकणारांनीं वर्षानुवर्षें तपश्चर्या करण्याची जरूर नाहीं.

५६ पाने ) संगीत प्रवीण भाग १ ला. ( किंमत ८ आणे

लेखक—प्रो. आर. जी. जोशी, एस्. पी.

प्रि. गांधर्व महाविद्यालय मुंबई ( शाखा ) या पुस्तकांत रे मालकंस, भीम, रे वर्ज भैरवी पलासी. ( हे लेखककृत राग ) व प्रचारांतलि कॉफी, बागेश्री, तिलंग, दुर्गा, तिलक कामोद, अडाणा, भिन्न, बडज, खमाज वगैरे, रागांत उत्तमोत्तम हिंदी कवितांवर ( श्रीकृष्णलीलेच्या व इतर कधीं न ऐकलेल्या नवीन व गोड चालींच्या २० चिजा ख्याल, ठुमरी, त्रिताल, होरी, झपताल एक्का, रूपक, वगैरे गायनाच्या सर्व प्रकारच्या ) व यांपैकीं ११ चिजांवर विस्तारानें नवीन रागांचे चिजांवर सुद्धां आलाप दिले आहेत.

मागणी जास्त असल्यामुळें प्रती थोड्या शिल्लक आहेत. तरी तावडतोब मागवा.

पत्ता—११ खेतवाडी मेनरोड गोवर्धनभुवन,
शेवटचा मजला, मुंबई ४.

## स्वर्गीय सुखाचे साधन

### संगीत हेंच संसाराचें भूषण आहे

आटपशीर, टिकाऊ, सुरेली पायपेट्या व हातपेट्या सिंगल डबल रीड—स्वस्त दरानें विकत मिळतील. २० रुपये सिंगल रीड. ३० ते १०० रुपयेपर्यंत डबल रीड.

पायपेट्या ९५ ते २०० रुपयेपर्यंत आर्डरप्रमाणें उत्तम करून देऊं—स्टँडर्ड हार्मोनियम कंपनी पिलहौस रोडवर ४० वर्षें ज्यांनीं दुकान चालविलें त्याच मालकांचे देखरेखीखालीं पेट्या तयार होतात.

**जनार्दन ब्रदर्स,**

हार्मोनियम मेकर व रिपेअरर, **गोवर्धनभुवन, दुकान नं. १२ मुंबई ४.**

---

॥ श्री ॥

ॐ सत्यमेव जयते

**उत्तम माल योग्य किंमतींत चोख वजनानें मिळण्याचें खात्रीचें दुकान**

म्हणजेच

## महाराष्ट्र किराणा स्टोअर्स

रेसिडेन्सी बाजार भागानगर ( हैद्राबाद दक्षिण )

**गिऱ्हाइकांचा सुखसंतोष व सोयी हेंच आमचें ध्येय आहे हें विसरूं नका.**

आमचेकडे चांदीचीं भांडीं व सोन्याचे दागिनेही मिळतात.

येथें येणाऱ्या प्रत्येक नाटक मंडळीनें एक वेळ अवश्य अनुभव घ्यावा.

कितीही ओढल्या तरी खोकल्याचे
नांव नाहीं.

# डायमंड इंडियन गोल्ड फ्लेक




१ पैशास २

सर्वत्र मिळतात.



**प्रो. घोडके.** विनोदी ( नकलाकार, स्त्री वेषांत )
महाराष्ट्रांत करमणुकीची खळबळ उडवून देणारे
**हेच ते पहिले.**

॥ श्री ॥

हॅम्लेट नाटकांत नाटक हेंच नवल,

तसेंच नाटकांतील नटांची

# -: नक्कल :-

हुबेहुब करून नव्या नवलाईची

साऱ्या महाराष्ट्रांत खळबळ

कोणी उडाविली ? तर

प्रो. घोडके यानींच होय ! !

यांच्या नकला केव्हां कुठें होणार ?

इकडे जरूर लक्ष द्या.

आपल्या गांवीं ते आलें कीं,

आधी तिकीटे रीझर्व्ह करा.

चैतन्य मुद्रणालय,

९५९, सदाशिव पेठ, पुणें २.

# मराठी वाङ्मयांत क्रांति झाली !

१ सीसोल्लंघन—ले. **मो. ग. रांगणेकर**

प्र. ले. **भा. वि. वरेरकर**

( एक क्रांतिकारक सामाजिक कादंबरी )      **किं.** १॥ रु.

२ पिकलीं पानें—ले. **अनंत काणेकर** बी. ए.; एल्‌एल्‌. बी.

( आबालवृद्धांच्या आवडीचा हा लघुनिबंधसंग्रह मराठी वाङ्मयांत प्रथमच प्रसिद्ध झालेला आहे. विद्वान लेखकांचे व वर्तमानपत्रांचे उत्कृष्ट अभिप्राय )      **किं.** १। रु.

३ मोत्यांचीं कुडीं—ले. **दौंडकर** एम्. ए., एल्‌एल्. बी.

प्र. ले. **वि. स. खांडेकर**. बी. ए.

( उत्कृष्ट लघुकथासंग्रह. महाराष्ट्रांतील सर्व विद्वानांनीं व वृत्तपत्रांनीं एकमुखानें प्रशंसिलेला हा सामाजिक लघुकथासंग्रह तुमच्या ग्रंथालयाची शोभा वाढवील.      **किं.** १। रु.

४ कल्पवृक्षांच्या छायेंत—ले. प्रो. **लक्ष्मणराव सरदेसाई**.

( गोमन्तकीय जीवनक्रमाचें यथोचित वर्णन दिग्दर्शित करणारा सामाजिक लघुकथासंग्रह. )      **किं.** १। रु.

याशिवाय सर्व प्रकारचीं शालोपयोगी तसेंच इंग्रजी व मराठी पुस्तकें फारच माफक दरानें मिळण्याचें एकच ठिकाण म्हणजे—

**रामकृष्ण बुक डेपो**

**न्यू अँड सेकंड हँड बुकसेलर्स**

**अँड पब्लिशर्स**

**गिरगांव, मुंबई नं. ४**




# नामांकित व महशूर गायकांचें

## स्वर्गीय संगीत "ओडियन" रेकार्ड्वरच

## ऐकावयास मिळतें.



खानसाहेब अबदुल करीमखान
सौ. हिराबाई बडोदेकर
बाई सुंदराबाई
सौ. दुर्गाबाई खोटे
श्री. बालगंधर्व
श्री. लोंढे
श्री. मारुतिराव पेहेलवान
श्री. दिनकरराव अमवल
श्री. रामभाऊ गुळवणी

तुमच्या येथील ओडियन 'डीलर्स'कडे वर दिलेल्या ओडियन आर्टिस्टच्या रेकार्डबद्दल चौकशी करा अगर खालील पत्त्यावर लिहा.

**सोल डिस्ट्रिब्यूटर्स रुबी रेकार्ड फोर्ट, मुंबई.**

॥ श्रीविठ्ठल प्रसन्न ॥

# बालगंधर्वांच्या नवलकथा.

## नाट्यकलेचा त्रोटक पूर्वेतिहास व सर्वश्रेष्ठ किर्लोस्कर संगीत मंडळींत बालगंधर्व कसे आले व कां आले.

आपल्या पवित्र भारतभूमीत फार प्राचीन कालापासून नाटकें करण्याची चाल आहेच. सदर गोष्टीला आपली प्राचीन पोथ्या, पुराणें आधारभूत आहेतच. तेव्हां नाटकें करणें ही गोष्ट हलक्या दर्जाची नाहीं, हे आतां सुशिक्षितांना कळून चुकलें आहे. त्याच प्रमाणें गायनवादन ही कला श्रीगजानन, नारद, तुंबर इत्यादि देवादिकांना अत्यंत प्रिय होती. ही गोष्ट सुद्धां सुशिक्षित वाचकांना नव्यानें सांगण्याची जरूरी नाही. शंभर वर्षाच्या पूर्वीच्या काळ अत्यंत धामधुमीचा होता. त्यामुळें वरील कला त्या धामधुमीच्या काळांत कांहीं काळ लुप्त झाल्या होत्या. परंतु १८१८ सालापासून हिंदुस्तानांत इंग्रजांचे एकछत्री राज्य सुरू झाल्यापासून सर्वत्र शांतता लौकरच प्रस्थापित झाली आणि त्यामुळेंच सुमारें पाऊणशे वर्षांपूर्वीच कै० विष्णुदास भावे यांनीं पुन्हा नाट्यकलेला आरंभ केला. पुन्हां म्हणण्याचें कारण इंद्रादि देवादिकापुढें नाट्यप्रयोग अनादिकालीं होत असत. कविवर्य कालिदास यांच्या विक्रमोर्वशीय नाटकाचे आधारें गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं. अलीकडे तर गायन, वादन, अभिनय, नाटकें इत्यादि कला आपल्याला अवगत होण्याविषयीं सुशिक्षित आर्य स्त्रीपुरुष उत्साहाने व आनंदानें खटपट करीत आहेत. मुलामुलींच्या शाळांतून प्रत्येक वर्षी गॅदरिंगच्या आनंदाच्या प्रसंगीं लहान मोठे विद्यार्थी आपल्या गुरुजींच्या सहाय्यानें नवी नवी नाटकें करून संगीत नाट्य कलेविषयीं आपले प्रेम किती आहे व आपल्याला या कलेची आवड किती आहे ही गोष्ट सक्रिय सिद्ध करून

दाखवित आहेत. परंतु नाट्यकलेची दुर्दशा व बदनामी सुमारे पन्नास वर्षांपूर्वी जी झाली होती, तिचें कारण असें वाटतें कीं, कै० विष्णुदास भावे हे स्वतः जरी कुलीन सद्गृहस्थ होते तरी त्यांना मिळालेली कांहीं मंडळी अत्यंत हलक्या दर्जाची व हलक्या विचाराची होती. व कै० भावे यांचेंच अनुकरण करण्याकरतां आणखी कांहीं थोड्या त्यावेळीं ज्या नाटक मंडळ्या निघाल्या त्यामध्यें सुद्धां कांहीं मंडळी हलक्या दर्जाची होती असे म्हणतात. त्यावेळची जुनी मंडळी त्या नाटक मंडळ्या संबंधानें थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे असें सांगतात कीं, नाटक कंपनीतील एखादा नट जर कांहीं कामा करतां आपल्या दारावरून जात आहे. असे जर पाहिलें तर, कुलीन बायका आपल्या घराची दारें ताबडतोब बंद करीत असत. जणुं कांहीं गणेश चतुर्थीचा चंद्र पाहिल्यावर भाविक लोकांना एक प्रकारचा आळ येईल अशी भीती वाटत असते त्याचप्रमाणें कसला तरी आपल्याला कलंक लागेल अशी त्या काळच्या स्त्री पुरुषांना भीति वाटत होती.

### कै० भावे यांची नाटकें करण्याची पद्धत कशी होती ?

भावे यांच्या नटमंडळींत बहुतेक सर्व नटांना भारत रामायण साधारणपणें तोंडपाठ होतीं असे म्हणतात. म्हणून त्यावेळीं नाटककार असे कोणीच नव्हते. आज " रावणवध " नाटक आहे असे नटांना मुख्य चालकांनी फक्त सांगावयाचे कीं, सर्व नटांनी आपापली कामें रंगभूमीवर चोख करावयाची. रामाची भूमिका घेणाऱ्यानी आपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें शेजारच्या पात्राशीं त्या त्या अनुरोधानें बोलावयाचे त्याचप्रमाणें सीता, लक्ष्मण, रावण इत्यादि पात्रांनीं करावयाचे. मात्र एक सूत्रधार नमनापासून तो नाटक संपेतोपर्यंत रंगभूमीच्या एका बाजूला हातात टाळ घेवून उभा असावयाचा. आणि त्याच्याच शेजारी कथेकऱ्याच्या शेजारी ज्याप्रमाणें घोडीवर मृदंग ठेवून वाजवणारा उभा असतो, त्या प्रमाणें मृदंग वाजवणारा उभा असावयाचा. राम, लक्ष्मण, सीता इत्यादि पात्रांनीं रावण वधांतील म्हणावयाची पदें एकट्या सूत्रधारानें नाटक संपेपर्यंत त्या त्या पात्रांची त्या त्या वेळची पदें म्हणावयाची. कारण त्या वेळच्या पात्रांना मुळींच गातां येत नव्हते. त्याचप्रमाणें हंसवण्याकरतां एक विदूषक या पात्राची योजना

केलेली असे. त्यावेळचे विदूषक पात्र हल्लीं सर्कशीतील बफूनप्रमाणें तोंडाला वेडावाकडा रंग लावीत असे, व आपल्या बुद्धीसामर्थ्यानें कपोलकल्पित कांहीं तरी बोलून लोकांना मधून मधून हंसवीत असे त्या वेळीं ज्या ज्या नाटक मंडळ्या अस्तित्वात होत्या, त्या सर्व वरील पद्धतीच्याच होत्या. मात्र आपापली नाटकें निरनिराळीं करीत असत. हरिश्चंद्र, कंसवध, सुभद्राहरण, लंकादहन वगैरे त्या वेळच्या नाटकांचीं नांवें असत.

## त्या वेळच्या नाटकमंडळ्यांची अंतर्व्यवस्था.

त्यावेळीं नाटक मंडळी चालवण्यास पंधरा ते वीस मंडळी पुरे होत असत. त्यांत फक्त एक गडी नोकर या नात्यानें ठेवलेला असे. बाकी सर्व मंडळी भागीदार या नात्यानें कंपनीशी बांधलेली असत. त्यामध्यें राक्षसपार्टी नट शरीरानें धिप्पाड सशक्त असत. देवपार्टी नट मंडळी शरीरानें साधारण शक्तिमान व नाका डोळ्यांनीं मात्र सुंदर असावी लागत व स्त्रीपार्ट घेणारी मुलें स्वरूपानें मोहक व नाजूक अशीं असत. राक्षसपुठयांतील नट मंडळींनी पाणी आणणें व स्वयंपाककरणें ही कामें करावयाचीं, देव पुठ्यांतील नट मंडळींनी सर्व मंडळींना वाढण्याचें काम दररोज दोन्ही जेवणाचे वेळीं करावयाचें आणि स्त्री पुठयांतील नाजूक मुलांनीं फक्त चटकदार चटणी वाटणें, तूप वाढणें इत्यादि कामें करावयाचीं आणि गड्यांनीं जेवण होतांच सर्वांची उष्टीं काढणें, त्या जागी सारवणें, भांडी घासणें हीं कामे करावयाचीं.

## त्या वेळचीं नाटकगृहें.

कंपनी ज्या ज्या गांवीं जात असे त्या त्या गांवीं एखादा मोठा जुना वाडा अगर मोठें जुनें देऊळ पाहून त्या वाड्याच्या किंवा त्या देवळाच्या चौकांत गावांतील घरंदाज किंवा व्यापारी लोकांकडून पाले व मोठमोठीं लांकडें मागून आणून त्या त्या चौकांत ती लांकडें पुरून वर पालांचें आच्छादन घातलें कीं थिएटर तयार झालें. वाड्यांतील बैठकीची उंच जागा अगर देवळांतील उंच ओऱ्या याना रंगभूमी समजून त्या वेळचीं पात्रें त्यावर नाटकें करीत असत. पालें व लांकडे देणाऱ्या सद्गृहस्थांना भाड्याच्या ऐवजी फुकट पास देण्याचीं त्यावेळ. वहिवाट होती.

## कपडे व दागिने वगैरेची व्यवस्था त्यावेळीं कशी होती ?

ज्या ज्या गांवीं नाटक मंडळी जात असे त्या त्या गांवच्या श्रीमंत सद्गृहस्थांना नाटक मंडळीतील म्होरक्यानें प्रथम जाऊन भेटावयाचे आणि विनंती करावयाची कीं, आमचे या गावांत जेवढे प्रयोग होतील, त्या सर्व प्रयोगास आपण सहकुटुंब सहपरिवार प्रयोग पहावयास यावयाचे. दुसरी विनंति आमची ही आहे कीं आमच्या नाटक प्रयोगाच्या वेळीं जे जे लहान मोठे कपडे लागतील व दागिने लागतील ते ते नाटक प्रयोग होई तो पर्यंत आमच्या पात्रांना भूमिकेकरतां वापरण्यास आपण द्यावे ! नाटक मंडळीच्या म्होरक्याची ही विनंती त्या वेळचे धनिक मान्य करून मदत करीत असत. अर्थात् त्यावेळीं दागिन्याकरतां किंवा कपड्याकरतां नाटक मंडळीच्या चालकाना एक पै देखील भांडवलाची जरूरी भासत नसे.

## श्रीराम, लक्ष्मण, रावण इत्यादी पात्रांना लागणारी किरीट कुंडलें त्यावेळीं कशी तयार करीत असत ?

त्यावेळच्या नाटक मंडळ्यांतील नट मंडळी स्वतः कुशल कारागीर होते. श्रीरामाला किंवा रावणाला लागणारा मुगुट घरीच ते तयार करीत असत. शेतांतील माती आणून त्याचा चिखल करून त्याची मुगुटाकृती एका पाटावर प्रथम तयार करावयाची व त्यावर जुनें कागद एकावर एक खळीने बरेच थर चिटकवून तयार करावयाचे आणि हे सर्व सुकल्यानंतर आंतील माती काढून टाकावयाची अर्थात सुकलेली जाड कागदांची मुगुटाकृती शिल्लक राहावयाची त्या वाळलेल्या कागदाच्या मुगुटावर सोनेरी खोटा वर्ख चिकटवावयाचा व हिऱ्या माणकाच्या ऐवजी लहान लहान दुड्या पैशाच्या आकारचे गोल इंग्रजी आरसे गोल भागावर सर्व बाजूनी चिकटवावयाचे. अशा रीतीनें सीता स्वयंवराच्या, अगर रावण दरबारातल्या मोठमोठ्या राजांच्या सोंगाला लागणारे मुगुट नट मंडळी घरच्या घरीच तयार करीत असत.

पौराणिक नाटकाची व नाटक मंडळ्यांची वरील हकीकत त्यावेळचे दृश्य डोळ्यापुढं येण्यास साधारणपणें पुरे आहे. नंतर १८८० साली कै. अण्णासाहेब

किर्लोस्कर यांनी नाटक मंडळीच्या घरच्या व्यवस्थेंत आणि रंगभूमीच्या गद्य व संगीत नाट्य कलेंत यक्षिणीची कांडी फिरवल्याप्रमाणें एकदम क्रांती करून आपली स्वतःची किर्लोस्कर मंडळी स्थापन करून नव्या पद्धतीनें सुरू केली ती पद्धत म्हणजे नाटककारानीं नाटकें लिहिलेलीच नटांनी पाठ करावयाची. तज्ञ उत्तम अभिनय गुरुकडून आपापल्या भूमिकेचा अभिनय नटानीं शिकून आपापल्या भूमिका तयार करावयाच्या. संगीत नटानें संगीत पदें व गद्य ज्या त्या नटानें स्वतःच बोलून व गाउन दाखवावयाचे. कपडे, दागदागिने, रंगभूमीला लागणारे पडदे, सीन वगैरे सजावट कंपनीच्या मालकानी स्वतःच्या भांडवलाच्या आधारानें स्वतःच तयार करावयाचे त्याचवेळीं उत्तम कंपन्यांची नाटके सुव्यस्थित स्वरूप प्रेक्षकानां पहावयास मिळतात. या सर्व गोष्टींचे श्रेय मुख्यतः कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांनाच देणें योग्य आहे.

## १८८० सालीं किर्लोस्कर संगीत मंडळीची स्थापना सर्व प्रकारें श्रेष्ठ दर्जाची कशी झाली याची त्रोटक हकीगत.

कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यानीं कविवर्य कालिदास यांच्या संस्कृत शाकुंतलाचे मराठी भाषेंत "संगीत शाकुंतल" भाषांतर म्हणून केलें. आणि किर्लोस्कर संगीत मंडळी स्थापन केली. शाकुंतल नाटकाचा प्रथम प्रयोग पुणें येथें बुधवार पेठेंतील, भांग्या मारूती समोरील आनंदोद्भव थिएटरांत झाला. मुख्य नट सुप्रसिद्ध गायक मोरोबा वाघुलीकर यानीं त्यावेळीं दुष्यंताची भूमिका केली होती. शकुंतलेची भूमिका श्री. शंकर बापूजी मुजूदार ( किर्लोस्कर कंपनीचे माजी मॅनेजर व मालक ) यांनी केली होती. कण्वाची भूमिका सर्वोत्कृष्ट गायक व बीन सतार वाद्य निपुण अशा ईश्वरदत्त देणगीच्या मधुर कंठाचे प्रमुख नट कै० बाळकोबा नाटेकर यानीं केली होती आणि बाकीचे सर्व नट आपापल्या परीने उत्तम काम करणारे होते असे म्हणतात. त्याचप्रमाणें रंगभूमीची सजावट पडदे, सीन, कपडे वगैरे त्यावेळीं मोल्यवान व योग्य प्रकारे होते. शकुंतलेची भूमिका शंकरराव मुजूमदार गाणें येत नसल्यामुळें गद्यातच करीत असत. संगीत शाकुंतलातील "संगीत" या शब्दाला बाध येऊं नये म्हणून फक्त तिसऱ्या

अंकांत " तुझें मन ते मला ठाऊक नाहीं " ही एकच दिंडी शकुंतलेच्या भूमिकेंत ते म्हणत असत. सदर दिंडी " तव मानस कैसें काय " या पदाच्या ऐवजीं के० अण्णासाहेब किर्लोस्कर यानीं त्यावेळींच्या गद्य शकुंतले करतां तयार केली होती. पुढें एक वर्षानीं के० भाऊराव कोल्हटकर मुख्य स्त्रीभूमिके करतां अण्णासाहेब याना महत्प्रयासाने मिळाले. महत्प्रयासानें म्हणण्याचें कारण भाऊराव कोल्हटकर यांचे वडील कथा करण्याचा धंदा करीत होते आणि त्यांच्याच मागे साथीदार म्हणून गायकाचे काम भाऊराव करीत होते. यांचे वडील जुन्या मताचे असल्या कारणानें स्त्री वेष घेण्यास आपला मुलगा कसा पाठवावा, आणि नाटकासारख्या धंद्यांत घालावा कीं, न घालावा अशा काळजींत होते. परंतु के० अण्णासाहेब किर्लोस्करांचा व त्यानीं स्थापन केलेल्या किर्लोस्कर मंडळीचा एक वर्षांचाच का होईना लौकीक त्यांना कळून येतांच त्यांचे अनुकूल मत होऊन त्यांनीं भाऊराव याना किर्लोस्कर मंडळींत पाठवून दिले. नंतर मोरोबा भाऊराव, बाळकोबा, नाटेकर व शंकरराव मुजूमदार या उत्तम नटांचा संच एक ठिकाणीं जमतांच किर्लोस्कर मंडळीचा बोलबाला सर्व माहाराष्ट्रभर अल्पकालांत सर्वतोमुखीं झाला. किर्लोस्कर संगीत मंडळी स्थापन झाल्यापासून सुमारें पांच वर्षांनी अण्णासाहेब किर्लोस्कर परलोकवासी झाले.

## अण्णासाहेब किर्लोस्कर यांचा निस्वार्थीपणा !

अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या मरणसमयींच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या पश्चात् पुढील प्रमाणें किर्लोस्कर मंडळींची व्यवस्था करण्यात आली. किर्लोस्कर मंडळींची मालकी अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं आपल्या आप्तेष्ट मागसाला न देतां रंगभूमीवर प्रमुख कामे करणाऱ्या नटाना म्हणजे फक्त तिघाना देण्यांत आली. के. भाऊराव कोल्हटकर, के. मोरोबा वाघुलीकर के. रामभाऊ किंजवडेकर असे तिघे कंपनीचे मालक अण्णासाहेबांच्या पश्चात् त्यांच्याच इच्छेवरून झाले. असे ऐकण्यांत आहे. त्याच वेळीं के. बाळकोबा नाटेकर याना दरमहा २५० रुपये देण्याची योजना ठरली. व त्याप्रमाणें बाळकोबा नाटेकर यानी किर्लोस्कर मंडळीची बरीच वर्षे नोकरी केली. पण पुढें बाळकोबा नाटेकर यांना पिनस झाल्या-

मुळें स्टेजला त्यांचा आवाज निकामी झाला. व त्यानीं किर्लोस्कर मंडळीची नोकरी सोडली.

## बाळकोबा नाटेकर यांचा मुख्य बाणा.

नाटेकर यांनीं किर्लोस्कर मंडळीची नोकरी सोडल्यानंतर लहानशा बैठकीत त्यांचे मंजुळ गाणे लोकांना अतिशय आवडत होते. म्हणून कांहीं नाटक मंडळ्यांनीं आपल्या नाटक मंडळींत सौभद्र नाटकांत कृष्णाचे व नारदाचे काम करावे अशी विनंती केली. परंतु नाटेकर यांनीं त्या विनंति करणाऱ्या मंडळींना सडेतोड उत्तर दिले कीं, मी आजन्म किर्लोस्कर मंडळी शिवाय कोणत्याही नाटक मंडळीच्या रंगभूमिवर रंग लावून काम करणार नाहीं. ही प्रतिज्ञा नाटेकर यांनीं आमरण पाळली.

## कै. मोरोबांचा निस्वार्थीपणा.

१८९५–९६ च्या सुमारास कै. भाऊराव यांनीं पुरुषपार्ट करण्यास आरंभ केला व आपला स्त्रीपार्ट सोडण्याचा निश्चय जाहीर केला. त्या प्रमाणें आपल्या जागी कृष्णराव गोरे यांना उर्वशीची व शकुंतलेची भूमिका तयार करण्यास सांगितली. त्या भूमिका तयार होताच गोरे यांची मुख्य स्त्री पार्टाच्या जागी भाऊराव यानी योजना केली. ही गोष्ट मोरोबा वाघुलीकर यांना एक प्रकारे आवडली नाहीं. भाउरावासारखा प्रख्यात नट नायिकेच्या जागेवर आहे, तोपर्यंतच आपण नायकाचे काम करण्यांत भूषण आहे. तेव्हां ते भूषण नाहींसे होण्याची वेळ त्यांना दिसून येतांच मोरोबानी किर्लोस्कर मंडळी सोडण्याचा निश्चय भाऊराव यांना कळवला तेव्हां भाऊराव मोरोबांना म्हणाले, मला आता स्त्रीपार्ट शोभत नाहीं म्हणून मी स्त्री पार्ट सोडला तर, तेवढ्याच करतां रागावून आपण कंपनी सोडू नये. तेव्हां मोरोबा म्हणाले, मी मुळींच रागावलो नाहीं. परंतु कालानुसार घडून आलेल्या रंगभूमीच्या फेरबदलांत मला आपला मान राखून आनंदांत घरीं बसण्यास परवानगी द्या ! या पुढील आयुष्य हरीभजनांत मी घालविणार आहे तेव्हां भाऊराव यांनीं मोरोबांना सुमारें चौदा, पंधरा वर्षांच्या

आपल्या मालकीच्या भागाबद्दल आम्हाला झेपेल अशी रक्कम मागाल अशी आशा आहे असे विनविले. त्यावर मोरोबानी बहुमोल असें एकच उत्तर दिलें. " मला माझ्या भागाबद्दल आपण एक पै सुद्धां देऊं नका. आण्णासाहेब किर्लोस्करांच्या कृपेनें जन्मभर खाण्यापिण्यापुरते जे कांहीं मला मिळाले आहे तेवढे पुरे आहे. फक्त किर्लोस्कर मंडळींचे नांव व श्रेष्ठत्व कायम ठेवून उत्तम प्रकारें कंपनी चालवा म्हणजे झाले. " मोरोबांचा हा उदारपणा पाहून भाऊराव फारच संतुष्ट झाले व त्यांचा कंठ दाटून आला. भाऊरावांनी मोरोबाना पेन्शन दाखल फायद्यांतून एक आण्याची वाटणी देण्याचे ठरविले होते व त्याप्रमाणें बरीच वर्षे तो फायदा त्याना मिळत होता असे म्हणतात.


शास्त्र शुद्ध पद्धतीनें दातांची व हाडांचीं सर्व कामें निर्दोष व्हावीं अशी इच्छा असेल तर

जपानी दवाखान्यांत या

तसेंच सर्व असाध्य रोगावरही खात्रीचे इलाज करूं.

विशेष सोय

स्त्रियांचे तपासणी करितां तज्ञ डॉक्टरणीची सोय आहे.

बाळंतपणाची घरच्या सारखी सोय फक्त आमचेकडे आहे.

१७६ बुधवार पेठ, बेलबागेजवळ पुणें. २ } जपानी दवाखाना.



कै० आण्णासाहेब किर्लोस्कर.



कै० रामभाऊ किंजवडेकर.



कै० लोकमान्य टिळक.

हवाशुद्धीकरतां शुद्ध स्वदेशी

मोहक वासाची

# अस्सल चंदनी उदबत्ती

सर्वत्र ) वापरा ( मिळते.

यांत कोळसा वगैरे जिन्नस वापरले नसून फक्त चंदनच वापरलें आहे.

एक वेळ वापरून खात्री करून घ्या.

देवल ॲन्ड सन् ,५९९ सदाशिव पेठ, हौदाशेजारीं, पुणें.

## १९०१ सालीं फेब्रुवारी महिन्यांत भाऊराव कोल्हटकर परलोकवासी झाले. पण मरण्यापूर्वीच किर्लोस्कर मंडळी सुव्यवस्थेने चालविण्याची त्यानीं तरतूद कशी केली होती ?

भाऊराव मरण्यापूर्वी किर्लोस्कर मंडळींचा सर्व संच उत्तम होता. फक्त भाऊराव यांच्या जागीं कै. नानासाहेब जोगळेकर यांची योजना केली होती. भाऊराव मरते समयीं सुमारें सहा महिने आजारी होते. त्यामुळें किर्लोस्कर मंडळीस सुमारें सहा महिने सुट्टी देण्यात आली होती. त्यावेळीं विशेष वाखाणण्यासारखी गोष्ट ही की, कंपनीतील एकही मनुष्य दुसऱ्या कोणत्याही कंपनींत गेला नाहीं व जोगळेकरही किर्लोस्कर मंडळीस महत् प्रयासानें मिळाले. कारण जोगळेकर त्यावेळीं लोकमान्य टिळकानीं काढलेल्या लॉ क्लासमध्यें वकीलीचा अभ्यास करीत होते. त्यामुळें जोगळकरांचे वडील 'तूं वकीली पास झाल्याखेरीज नाटकांत जाऊं नकोस' असें सांगत होते. परंतु किर्लोस्कर मंडळीच्या चहात्यांनीं किर्लोस्कर मंडळींत जाण्याचा फारच आग्रह केल्यामुळें, जोगळेकर यांनीं लोकमान्य टिळकांना याबाबतीत आपला अभिप्राय काय ? असा प्रश्न केला. तेव्हां लोकमान्यानीं उत्तर दिलें की, तुमचा नैसर्गिक कल गायन कलेंस जितका योग्य आहे तितका वकीलीच्या अभ्यासांत योग्य नाहीं; म्हणून ' तुम्ही वकील झालांत तर एखाद्या गावांत अगर गल्लीतील लोकांत फार तर प्रसिद्ध व्हाल. परंतु यावेळीं तुमच्या-जवळ गायनाची कला तयार आहे, म्हणून जर किर्लोस्कर मंडळींत भाऊराव यांच्या जागीं काम करण्यास तुम्हाला बोलावित आहेत तर तुम्हीं अवश्य फायदा घ्या ! भाऊराव यांच्या जागीं तुम्हीं रुजू होतांच संपूर्ण महाराष्ट्रांत तुमचें नांव ताबडतोब गाजेल. व सहा महिने किर्लोस्कर मंडळीं बंद असलेली तुमच्या एकट्याच्या रुजू होण्याच्या योगानें सुरू होतांच एक अपूर्व पुण्य तुम्हांस लाभणार आहे." याप्रमाणें लोकमान्यांच्या अभिप्रायास मान देऊन किर्लोस्कर कंपनींत कै० भाऊराव यांच्या जागेवर जोगळेकर रुजू झाले. त्यावेळीं कंपनींचे मालक रामभाऊ किंजवडेकर हें एकटेच होते. जोगळेकर यांना दरमहा शंभर रुपये पगार देत असत.

## रामभाऊ किंजवडेकर यांचा निस्वार्थीपणा.

भाऊरावांच्या मृत्यूनंतर भाऊरावांची कामें जोगळेकरांना बसवण्याकरतां सुमारे चारसहा महिने किर्लोस्कर मंडळी नुकसानींतच होती. म्हणून किर्लोस्कर मंडळीचा अण्णासाहेबांच्या वेळेपासूनचा चाललेला संस्थानी थाटाचा खर्च कांहीं दिवस कमी करावा अशी एका हितचिंतकानें किंजवडेकरांस सूचना केली, पण किंजवडेकर यानीं उदारपणानें असे उत्तर दिलें कीं, "मी घरून कांही द्रव्य घेऊन आलो नाही. जी कांहीं इस्टेट माझ्याजवळ आहे, ती किर्लोस्कर मंडळीवरच मी मिळविलेली आहे. ती सर्व इस्टेट नाहींशी होईतोपर्यंत अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं घालून दिलेल्या वळणाचा थाट हा असाच चालायचा," असे म्हणून तशा नुकसानींत सुद्धां कोणत्याही बाजूचा त्यांनीं पैचाही खर्च कमी केला नाही.

## किंजवडेकराचें दुसरे मोठे औदार्य !

अण्णासाहेबांनीं किर्लोस्कर मंडळी स्थापन केल्यापासून दर वर्षाला सर्व मंडळीस दोन महिन्याची वार्षिक सुट्टी मिळत असे. व या वार्षिक सुट्टीच्या वेळीं मालकांच्या भागीदारीतून सुमारें दीडदोन आण्याच्या 'गुड कॉंडक्ट फंडाच्या' भागांतून मालक वाटून घेणाऱ्या रकमेच्या वेळीं सदर आणेवारीच्या हिश्शानें साठलेली रक्कम प्रत्येक मनुष्यास 'गुड कॉंडक्ट' म्हणून बक्षीस मिळत असे. जोगळेकरांना प्रत्येक नाटकांतून नायकाचें काम तयार करावयाचे होते म्हणून, सुमारें दोन वर्षें किर्लोस्कर मंडळीस सुट्टी मिळाली नाहीं. दोन वर्षानंतर सुट्टी होण्याच्या समयीं भाऊरावांच्या वेळी मला जेवढा भाग होता तेवढेच पैसे मला त्या भागाचे द्या व भाऊरावांच्या वाटणीचा सर्व भाग जोगळेकर, मुजुमदार, गोरे, चिंतोबा गुरव, परचुरे, व्यंकटराव इत्यादि प्रमुख मंडळींना त्यांच्या त्यांच्या कामाच्या योग्यतेप्रमाणें बक्षिस म्हणून वाटून द्यावा. बाकीच्या लहान मंडळींना ज्यांच्या त्यांच्या कामाच्या योग्यतेप्रमाणें माझ्या मालकीच्या सुरवातीच्या वेळे-पासून प्रमोशन द्या असे, किंजवडेकरांनीं सांगितले व त्याप्रमाणें केलेही आणि नंतर सुट्टी दिली. त्या सुट्टींत जोगळेकर यांना भाऊरावांच्या जागेवर तुम्ही काम करतां तेव्हां सुट्टी नंतरच्या आरंभापासून तुम्ही नोकर न राहातां मालक व्हावें,

असे सांगितले. व त्याप्रमाणें सुमारें १९०३ सालापासून भाऊरावांचा भाग त्यांना देऊन के० रामभाऊ किंजवडेकर यांनीं स्वखुषीनें मालक केले.

## ' जोगळेकर मालक–मग मी कां नाहीं ?' म्हणून गोरे रागावले.

" तुझा वयमानाचा पोरकटपणा जाऊन अभ्यासाने का होईना तुझ्यामध्यें प्रौढपणा येतांच आम्ही तुला मालक करूं " असें नटवर्य गोरे यांना सांगण्यांत आले. परंतु नटवर्य गोरे यांच्या उसळत्या गरम रक्ताला तेवढा दम धरवला नाहीं. म्हणून लौकरच त्यावेळीं किर्लोस्कर मंडळींच्या जवळ जवळ बरोबरीनें गाजत असलेल्या स्वदेश हितचिंतक नाटक मंडळीत एक भागीदार या नात्यानें गोरे रुजू झाले. भाऊरावांच्या मरणानंतर जोगळेकर नायक व गोरे नायिका ही जोड रंगभूमीवर योग्य अशी जुळली होती. कारण चिंतोबा गुरव, बोडस वगैरे इतर सर्व मंडळींचा संच फारच चांगला होता. परंतु गोरे किर्लोस्कर मंडळी सोडून गेल्याबरोबर नायिकेच्या अभावीं किर्लोस्कर मंडळींच्या रंगभूमीवर एकदम अंधःकार पसरला व एक वर्षाच्या अवधीत किर्लोस्कर मंडळीस नायिकेच्या जागी एक तेजस्वी नट मिळेतोपर्यंत जाहीर रीतीनें सुट्टी घेण्याची पाळी आली. ( गोरे यांनीं मुंबई मुक्कामी किर्लोस्कर मंडळी सोडली. मग मुंबईहून कंपनी बेळगांव, हुबळी, रबकवी, जमखिंडीहून मिरज मुक्कामीं आली व नाइलाजानें मिरज मुक्कामांत सुट्टी द्यावी लागली. ) सदर सुटींत सर्व मंडळी मिरजेसच होती. कोणी तरी नायिकेच्या जागी मुलगा पाहाण्याच्या खटपटींत मुजूमदार आहेत ही बातमी मंडळीपासून गुप्त ठेवली होती, तरी फुटली ती अशीः—

जमखिंडी येथें किर्लोस्कर मंडळीचा मुक्काम असतांना **श्री शाहू छत्रपती सरकार कोल्हापूर** यांच्या इच्छेवरून एका सद्गृहस्थाकडून मंडळीचे मॅनेजर शंकरराव मुजूमदार यांना बोलावणें आले होते. शंकरराव मुजूमदार कोल्हापुरास जातांच श्रीशाहू छत्रपतींच्या दर्शनास गेले. त्यावेळीं छत्रपती म्हणाले **बालगंधर्व** या नांवाचा मुलगा येथें औषधोपचार करण्याकरितां आला आहे व गायनश्रेष्ठ अल्लादियाखा गवई यांच्या जवळ पुढें गायन शिकण्यास राहाण्याचा त्याचा हेतू आहे तर या मुलाला तुम्ही घेऊन जा. नायिकेच्या जागीं त्याचा योग्य उपयोग

होईल अशी माझी खात्री आहे. मुजुमदारांनीं चिंतोबा गुरव यांना बोलवून घेऊन त्या मुलाचे महाराजांच्या पुढें गाणे ऐकविलें त्याच वेळीं महाराजांनीं ' तूं मिरजेस औषध घेण्यास जा.' असा सल्ला दिला. बालगंधर्वांनीहि चारपांच दिवसांनी मी मिरजेस जातो' असें सांगितलें नंतर श्रीशाहूछत्रपतींनीं बालगंधर्व यांना "तूं किर्लोस्कर मंडळींत उतरण्यास जा म्हणजे, तुझी सर्व व्यवस्था चांगली राहील तेथील प्रसिद्ध डॉक्टरना तुझी प्रकृती दाखीव व औषधोपचार प्रकृती बरी होई तों पर्यंत सुरू ठेव" असे सांगितले. बालगंधर्वांची पूर्वपुण्याई मोठी व नाट्य कलेच्या देवतेचा मान त्यांना प्राप्त व्हावयाचा व तेव्हांपासून नाट्यसृष्टीत बालगंधर्व युग कित्येक काल सुरू व्हावयाचे म्हणूनच कीं काय खुद्द श्री छत्रपतींनीं आपल्या स्वतःच्या गाडींत बालगंधर्वांना बसवून त्यांनीं चिंतोबा गुरवसहित ऐन गाडीच्या वेळीं कोल्हापूर स्टेशनवर सहज फिरत फिरत आणले व गाडीची सुटण्याची वेळ तात्काळ होती म्हणून बालगंधर्व चिंतोबा बरोबर किर्लोस्कर मंडळींत जाण्याकरितां गाडींत चढले. ( सदर गोष्ट खुद्द चिंतोबा गुरव यांनीं सांगितली. ) श्री. शाहू छत्रपति बहुधा नेहमीं साधेपणानें बरोबर आपल्या आवडीच्या सद्गृहस्थांना आपल्या गाडीत बसविण्याचा मान देत असत, असा त्यांचा लौकिक ऐकावयास मिळतो. त्याप्रमाणें बालगंधर्व किर्लोस्कर मंडळींत एके दिवशीं संध्याकाळच्या गाडीनें चिंतोबा गुरव यांच्याबरोबर मिरज मुक्कामीं आले. बालगंधर्व किर्लोस्कर मंडळीच्या बिऱ्हाडी उतरतांच रीतिप्रमाणें त्यांच्या करतां चहा तयार केला. त्यांना व त्यांच्या बरोबर सर्व मंडळींना चहा पिण्याचा त्या दिवशीं तिसऱ्या वेळीं पुन्हां सर्व मंडळींना योग आला. चहापान होतांच सुमारें संध्याकाळचें सात साडेसात वाजले होते. किर्लोस्कर मंडळींचे गुरू गोविंद बल्लाळ देवल यांनीं बालगंधर्व यांना थोडे गाणें गावयास सांगितले. बालगंधर्वांचा तो आवडता विषय असल्यामुळें तेही गाणे म्हणण्यास तयार झाले. देवल मास्तरांनी पेटी, तबला, आपल्या खोलींत मागवला व लागलीच बालगंधर्वांचे गाणें सुरू झालें. कंपनीतील सर्व मंडळी गाणे ऐकण्याच्या उत्कंठेनें एकत्र जमली बालगंधर्व यांचे गाणे त्यावेळीं फारच उत्तम झाले. त्यांच्या आवडत्या चीजा त्यांनीं

म्हटल्या. त्यातल्या त्यांत मुख्य आवडती तीन गाणीं त्यांनीं शेवटीं म्हटली. ती खालील प्रमाणें:—( हा समारंभ पाहाण्यास प्रस्तुत लेखक प्रत्यक्ष हजर होता. त्यावेळीं तो किर्लोस्कर मंडळींचे हार्मोनियम मास्तर होता.)

**" बिहारी नयना मोरोरे "**

**" नका टाकून जाउ डावा डोळा पाण्यानी माझा भरला "**

**" धन्य जाहला तुम्ही माझा राम पाहिला "**

हें शेवटचें पद म्हणतांच बालगंधर्वांनीं आपलें गाणें संपवलें. गाणें संपतांच काशिनाथपंत परचुरे—किर्लोस्कर संगीत मंडळींतील म्हाताऱ्याच्या विनोदी कामांत प्रसिद्धीस आलेले—एकदम म्हणाले, "चल मुला उठ आमचा अण्णासाहेब किर्लोस्करांचा प्रसाद खावयाला चल " त्यावेळीं ताटे चटया मांडून सर्व मंडळींची जेवणाची तयारी झाली होती. लगेच बालगंधर्वांनीं कपडे काढले व सर्व मंडळींबरोबर ( अण्णासाहेबांचा प्रसाद ) जेवावयास बसले. सर्व मंडळी बरोबर आनंदानें त्यांनी जेवण केले. यावेळची मौजेची गोष्ट अशी आहे कीं, बालगंधर्वांना आतापासून मी किर्लोस्कर मंडळींत रहाणार आहे, हें मुळीच माहीत नव्हते. कारण ते यावेळीं किर्लोस्कर मंडळींत या बुद्धीने मुळींच आले नव्हते. पण अत्यंत शुभ योगायोग असा कीं, त्यावेळचा तो अण्णासाहेब किर्लोस्करांचा प्रसाद ते आतापर्यंत सेवन करीत आहेत व स्वतःबरोबर शेकडों लोकांना तोच अण्णासाहेबांचा प्रसाद सेवन करावयास लावीत आहेत. त्यावेळचे त्यांचे ते किर्लोस्कर मंडळींतील पहिलें जेवण म्हणजे अण्णासाहेब किर्लोस्करांचा प्रसाद सेवन करण्याची वेळ अत्यंत शुभ नाहीं असें कोण म्हणेल! कारण त्याच वेळच्या प्रसादानें बालगंधर्व आज पंचवीस वर्षांनीं नाट्यकलेच्या कीर्तीच्या व वैभवाच्या अत्यंत उंच शिखराला जाऊन पोंचले.

* * * * * *

# बालगंधर्व नाटकी जाळ्यांत कसे सांपडलें ?

बालगंधर्व औषधोपचाराकरतां म्हणून किर्लोस्कर मंडळींचा पाहुणचार श्रीशाहूछत्रपतींच्या आज्ञेनें घेऊं लागले हें खरें, परंतु किर्लोस्कर मंडळीस नायिकेची जागा भरून काढण्यास योग्य स्त्री नट समोर दिसतांच बुभुक्षिताप्रमाणें मंडळीनीं त्यांच्या भोंवतालीं आपलें जाळें पसरवण्यास सुरवात केली. काशिनाथपंत परचुरे, बोडस, चिंतोबा गुरव वगैरे मंडळींनी बालगंधर्वांना मुद्दाम युक्तीनें आपल्या बैठकींत सामील करावयाचे, इकडल्या व तिकडल्या गोष्टी बोलतां बोलतां मध्येंच असें बोलावयाचे कीं, " काय करावें हा मुलगा तर फार सुंदर आहे. याचे गाणें यावेळीं अत्यंत मधुर आहे. असं असून हा म्हणे आंता गवयाजवळ राहून गाणें शिकण्यास सुरवात करणार आणि गुरुजींची अनेक प्रकारें सेवा, खुशामत करून जेव्हां एकादें तप पुरें होईल तेव्हां कुठें स्वतःला गवई म्हणून घेणार ! किती बिचारा अज्ञान आहे! आम्हाला जर याच्याच वयांत इतकें सुंदर गाणें येत असतें व असा मोहक चेहरा अनकूल असता तर, आम्ही या भलत्या गवई होण्याचा वेड्या वाकड्या महत्वाकांक्षा तावडतोब पायाखालीं तुडवून टाकल्या असत्या आणि महाराष्ट्रांत सर्वोत्कृष्ट प्रसिद्ध असलेल्या सर्व श्रेष्ठ किर्लोस्कर मंडळींत नायिका होण्याकरितां, भाऊराव कोल्हटकर यांच्या कीर्तीचे व मानाचे ध्येय डोळ्यापुढें ठेवून त्या जागेचा अधिकार पटकावण्याचा प्रयत्न मोठ्या साहसानें मिळवून त्या जागी विराजमान होण्याकरितां किर्लोस्कर मंडळींच्या मालकांस छातीठोकपणें आव्हान केलें असतें. कारण कीर्ती, पैसा, व मान या गोष्टी या मुलाच्या ईश्वरदत्त देणगीमुळें तावडतोब चरणीं लोटांगण सहज घालूं शकल्या असत्या तेव्हां अशा अज्ञान मुलाला काय म्हणावें! गायनाचार्य अल्लादियाखां यांच्या जवळ आतांपासून म्हणे बरींच वर्षे गाणें शिकणार व गवई वर्गांत नंतर मान व पैसा मिळवण्याचा प्रयत्न करणार! तितका गुण शिकणें व मान मिळविणें वाईट आहे असें म्हणत नाहीं. पण प्रत्यक्ष अल्लादियाखां किंवा त्यांचे पट्टशिष्य भास्करबुवा बखले यांना यावेळीं असा कितीसा पैसा मिळतो आहे! अल्लादियाखांना म्हणे कोल्हापूर दरबारांतून दरमहा पन्नासच रुपये पगार आहे असें एकतो. पन्नास

किंवा पाउणशें रुपये एकादे वेळीं गाण्याचे मिळावयाचे ! तीच गत त्यांचे पट्टशिष्य भास्करबुवा बखले यांचीं नेव्हां इतक्या उच्च प्रतीचे गाणें समजणारे राजेरजवाडे किंवा सावकारांत तरी आम्हांस कुठें दिसत नाहींत. तेंच आमचे भाऊराव कोल्हटकर यांचे पहा! वरील मोठमोठ्या गवयांच्या मानानें गाणें अगदीं अल्प परंतु चेहेऱ्याच्या मोहकपणामुळें व गायनाच्या सुंदरपणामुळें स्त्रीपार्ट घेऊन रंगभूमीवर कामें करूं लागल्यापासून दहा, वीस वर्षांत लाखों रुपये मिळवून व पदवीधर आणि राजरजवाडे यांच्या प्रेमास पात्र होऊन यच्चावत् लहानापासून थोरापर्यंत सर्व महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांना आपलेसे वाटूं लागले. "

वरील किर्लोस्कर मंडळींतील अनुभवी नटांचे दररोजचे बोलणें ऐकून व किर्लोस्कर मंडळीचा संस्थानी थाट पाहून बालगंधर्व मोहीत झाले, व एकदम बोलूं लागले कीं, "तुम्ही सर्वजण म्हणता ही गोष्ट माझ्या मनाला पटली. परंतु हा काळ पावेतों मी माझ्या आईबापांच्या आज्ञांकित आहे, तेव्हां त्यांच्या आज्ञे-वांचून मला एकाएकी नाटक धंद्यांत कसे रुजू होता येईल ! " बालगंधर्वांचे मन पूर्ण आपल्या जाळ्यांत अडकलेले ध्यानी येतांच बोडस, चिंतोबा, परचुरे इत्यादि मंडळी म्हणालीं, "तुझ्या मनांत आमचे विचार हितावह आहेत असे पूर्ण बिंबले ना ! " बालगंधर्व यांनीं यावर उत्तर दिले "होय" तेव्हां बोडस, चिंतोबा, परचुरे वगैरे मंडळी म्हणाली, ' ठरले तर. तुला आम्ही जी नक्कल देतो ती पाठ करा-वयास घे म्हणजे झाले ! तुझ्या आई बापांचे मन आम्ही पूर्णपणे वळवितो आम्हांस पूर्ण आत्मविश्वास आहे. चल तर अण्णासाहेबांच्या पुढें " असे म्हणून अण्णा-साहेबांच्या हॉलमध्यें अण्णासाहेबांच्या तसबिरी पुढें नेले, व अण्णासाहेबांच्या तसबरीस नमस्कार करावयास लावला व बालगंधर्वांनीही भक्तिपुरःसर अण्णा-साहेबांच्या तसबिरीपुढें शीर नमविलें. लागलीच त्यांच्या हातांत शारदा नाटकाचे पुस्तक-त्या नाटकांतलि नटीचे काम पाठ करण्याकरतां दिलें. बालगंधर्वांनीही आदरयुक्त व भक्तिभावानें ते पुस्तक,-नक्कल पाठ करण्यास घेतले. ( त्यावेळीं शारदा नाटक ऐन भरभराटींत होते. )

* * * *

॥ श्री ॥

श्री छत्रपती शिवाजी महाराज यांचे कारकिर्दीपासून सतत सुमारें २५० वर्षे चालत आलेलें जुनें मिठाईचे दुकान खास पुणेंकरांच्या आश्रय खालील

# शुद्ध स्वदेशी साखरेची मिठाई.

आमचे मालांत पीठ आहे असे सिद्ध करणारांस १००० रुपये बक्षीस.

सातारचे सुप्रसिद्ध १ च मुख्य दुकान.

## कंदी पेढे.

पार्टी, उत्सव, समारंभ, नवस, परिक्षेंत पास झालेलें विद्यार्थी केसरी व पांढरे पेढे बारीक व मोठे वाटण्याकरितां मिळतात. तसेंच खव्याची बर्फी उत्तम तुपाचा चिवडा, दुध्या हलवा, बर्फी वगैरे सर्व माल दररोज ताजा मिळेल.

**दुर्गाप्रसाद चिन्नाप्पा मोदी.**

मिठाईवाले, लक्ष्मीरोड, केदारी बिल्डींग, पुणें.



कै० विष्णुदास भावे, आद्यनाटककार.



श्रीयुत दुर्गाप्रसाद मोदी.



श्रीयुत पांडुरंगराव भोसले.

## बालगंधर्वांचा सुमुहूर्तानें रंगभूमीवर प्रवेश
### पण
### गुप्तपणें ते कां ?

बालगंधर्व यांची शारदा नाटकांतील नटीची नक्कल पाठ होतांच कै. देवल मास्तर यांनी किर्लोस्कर मंडळीच्या पूर्वापार चालत आलेल्या शिस्तीप्रमाणें नटीचे काम फार मेहनत घेऊन उत्तम बसवून घेतलें. नंतर किर्लोस्कर मंडळीचे मालक व मॅनेजर यांनीं जोतिबाच्या डोंगरावरचे प्रसिद्ध ज्योतिषी शंकरशास्त्री देव यांच्या कडून बालगंधर्वांना रंगभूमीवर आणण्याकरतां शुभ दिवस व शुभ मुहूर्त ज्योतिष शास्त्राधारें पाहून घेऊन त्याच दिवशीं रात्रीं सुमारें नऊ वाजतां बालगंधर्वांना शारदा नाटकांतील नटीच्या भूमिकेंत रंगभूमीवर आणिलें. त्यावेळचे साधारणपणें यतार्थ वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें:—

जणुं कांहीं शारदा नाटक नव्यानेंच आज रंगभूमीवर येणार अशा प्रकारचा सर्व मंडळीच्या अंतःकरणांत उत्साह व आनंद उदित झाला होता. सूत्रधार. पारिपार्श्वक व नटी ( बालगंधर्व ) इत्यादि पात्रें आपापले रंग, पोषाक, उत्तम प्रकारें तयार करून ठरलेल्या वेळेपूर्वी सज्ज होते. रंगभूमीवरील लाईटही विद्युत् प्रकाशाप्रमाणें व एक प्रकारच्या उत्साहानें प्रकाशमान झाला होता. नेहमीं प्रमाणें ड्रॉपच्या पडद्यानीं रंगभूमी झांकली होती. आंतील पहिला महालाचा पडदा सोडून ठेवण्यांत आला होता. सूत्रधार व पारिपार्श्वक ही पात्रें नेहमीप्रमाणें स्वतःच रंगली पण नटी ( बालगंधर्व ) या पात्राला नटवर्य भोडस यांनीं उत्तम प्रकारें रंगविलें. नटी या पात्राला त्या दिवशीं मुद्दाम भारी भरजरी वस्त्रें नेसवण्यांत आलीं. त्याचप्रमाणें कंपनी जवळ असलेले उत्तमोत्तम अलंकार नटीच्या अंगावर घालण्यांत आले होते. उद्देश हाच कीं, मुलगा जरी सुंदर आहे, रंग जरी सुंदर केला, तरी भारी वस्त्रालंकारानीं नटवल्यावर मोहकपणाच्या अत्युच्च शिखरावर विराजमान झालेला तो प्रेक्षकांना दिसावा ! पडद्यांतील ही सर्व तयारी सर्वोत्कृष्ट अशी झाली. मात्र या वेळीं थिएटरचे सर्व दरवाजे बंद करण्यांत आले होते आणि किर्लोस्कर मंडळीची कांहीं प्रतिष्ठित निवडक स्नेही मंडळी तेवढीच काय ते बालगंधर्वांचे काम पाहाण्याकरतां कंपनीच्या मालकाच्या निमंत्रणावरून मिरज सरकारी थिएटरांत हजर होती. त्यांपैकीं प्रमुख सद्गृहस्थांची नांवें येणें प्रमाणें:—

रावसाहेब आगाशे मिरज संस्थानचे कारभारी, डॉक्टर भडभडे मिरज संस्थानचे सिव्हिलसर्जन, श्री. गोविंदराव सोर्टी मिरज संस्थानचे ड्रॉइंग मास्तर व कोल्हापूर येथून मुद्दाम आलेली किर्लोस्कर मंडळीचे कांहीं स्नेहीमंडळी थिएटरमध्यें हजर होती. शारदा नाटकांतील सूत्रधार नटीचा फक्त एकच प्रवेश बालगंधर्वांच्या नवीन कामाकरितां रंगित तालमीच्या रूपानें घ्यावयाचा ठरल्यामुळें बाकी सर्व मंडळी प्रेक्षक म्हणूनच बाहेर बसली होती. अर्थात् जोगळेकर, शंकरराव मुजुमदार, बोडस वगैरे सर्व मंडळी प्रेक्षक म्हणूनच बसली होती. मात्र कांहीं जणांना श्री. मुजुमदार यांनीं मुद्दाम कोणास माडीवर, कोणास ओट्यावर, कोणास पीटवर, कोणास खुर्चीवर, कोणास स्त्रियांच्या जागेंत बसण्यास सांगितले होते. व या सर्व मंडळींना असें सांगण्यांत आले होते कीं, त्या त्या जागेवरून या मुलाचे सोंग कसे काय दिसते ! त्याचप्रमाणें बोलणें व गाणें सर्व जागेवरून स्पष्ट ऐकावयाला येतें कीं, नाहीं ते लक्षपूर्वक पाहा ! व तालीम संपताच आपापला अभिप्राय स्पष्टपणें कळवा ! नाटकाच्या वेळेप्रमाणें कपडे पटांतील अण्णासाहेबांच्या तसबिरीची नेहमीप्रमाणें पूजा करून सुवासिक फुलांचा उत्तम भरदार हार घालण्यांत आला. सुवासिक उदाच्या धुराचा स्वाद रंगभूमीवर व सर्व थिएटरांत पसरला. व नाटकाच्या वेळेप्रमाणें पहिली व दुसरी घंटा वाजविली. तिसरी घंटा वाजतांच सुमुहूर्त साधून ड्रॉप उघडण्यांत आला, व नमनास सुरवात झाली. इकडे आंतमध्यें नटीच्या सोंगांत बालगंधर्व उत्तम रंगून व भरजरी वस्त्रें नेसून तयार होतांच त्यांना कपडेपटांत अण्णासाहेबांच्या तसबिरी पुढें नेऊन आपल्या कुलदेवतेचे स्मरण करून तसबीरीच्या पाया पडावयास सांगितले. बालगंधर्वांनीही

**तुम्हाला काय पाहिजे !** शुद्ध सोने चांदीचा खात्रीलायक तयार माल मिळण्याचे ठिकाण म्हणजेच पुणें येथील तुळशीबाग पश्चिम दरवाजा समोरील सुप्रसिद्ध—**दत्तात्रय बळवंत देशपांडे** यांचे सराफी दुकान.–ऑर्डरप्रमाणें जिन्नस तयार करून मिळतील $\frac{1}{4}$ रक्कम पाठविल्यास माल व्ही. पी. ने रवाना करूं. एकवार ऑर्डर पाठवून अवश्य अनुभव घ्या. मालाचे खरेपणाबद्दल लेखी गॅरंटी.

**देशपांडे सराफ, ८८७ सदाशिव पेठ, पुणें.**

यावेळीं सर्व कांहीं त्यांच्या स्वभावाला अनुसरून भक्तिभावानें व प्रेमळपणानें सर्व कांही केले. वेळ येतांच रंगभूमीवर नटीच्या कामांत प्रवेश केला. त्यांचा रंगभूमी-वर प्रवेश होतांच, बाहेर प्रेक्षक जरी थोडे होते तरी, आनंदाच्या भरांत त्या सर्वांनी कडाडून टाळ्यां वाजवल्यामुळें सर्व थिएटर दणाणून गेले. यावेळचा बाल-गंधर्वांचा नटीचा प्रवेश म्हणजे खाडिलकरांनी द्रौपदी नाटकांत सूत्रधाराच्या तोंडी घातलेलें विशेषण बालगंधर्वांनाच तंतोतंत शोभते, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाहीं. ( श्री. विष्णूचे पद चुरावयाचे सोडून साक्षात् लक्ष्मीच रंगभूमीवर अवतरली असा मला भास झाला. याच अर्थाचे द्रौपदीतील सूत्रधाराचें भाषण आहे. ) आणि बरोबरच हें बालगंधर्वांचे किर्लोस्कर मंडळींच्या रंगभूमीवरील पाऊल म्हणजे, किर्लोस्कर मंडळींत या शुभदिवसापासून लक्ष्मीचेंच पाऊल पडलें असे म्हणावयास हरकत नाहीं. कारण बालगंधर्व रंगभूमीवर काम करावयास लागल्यापासून किर्लोस्कर मंडळीच्या उत्पन्नाच्या व कीर्तीच्या भरभराटीचे पर्य-वसान सुमारें साडेसात वर्षांतच पुणें येथें किर्लोस्कर मंडळींचे **स्मारक** म्हणून अजमासे **एक लाख रुपयाचे किर्लोस्कर थिएटर उभारण्यांत आले.**

नटीच्या पदांस सुरवात होतांच साक्षात् रंगदेवता व गानदेवता त्यांच्या अंगांत संचारल्या असें सर्वांना वाटले आणि म्हणूनच प्रेक्षकांच्या मनाची व कानाची तृप्तता झाली नाही म्हणून प्रेक्षकांनी तीन तीन वेळा वन्समोअर देऊन आपली इच्छा तृप्त करून घेतली. याप्रमाणें उल्हासानें व आनंदानें सूत्रधार नटीचा प्रवेश पूर्ण होतांच ड्रॉपचा पडदा टाकण्यांत आला.



**पोरे आणि कंपनी**--आमचेकडे सर्व तऱ्हेचें पाणी तापविण्याचे तांब्याचे व पितळेचे बंब, तसेंच गरम झरे, लहान मोठे होतात, व फ्लशिंगच्या गोल व चौकोनी तांब्याच्या टाक्या वगैरे माल तयार मिळेल व ऑर्डर प्रमाणें करून देऊं.

**पोरे आणि कंपनी, ११९१ कसबा, पुणें शहर.**

**बालगंधर्वांना गुप्तपणें कां रंगवलें?** याचें मुख्य कारण या दिवसापर्यंत बालगंधर्वांच्या आईबापांची त्यांना रंगवण्यासंबंधानें किंवा कंपनीत ठेऊन घेण्या-संबंधानें कोणतीच परवानगी घेतली नव्हती. आईबापाच्या परवानगीशिवाय अज्ञान बालगंधर्वांच्या सम्मतीनेच नटीची ही रंगीत तालीम करण्यांत आली.

किर्लोस्कर मंडळीच्या चालकांना बालगंधर्व प्रेक्षकांना सर्व प्रकारे कसे आवडतील, हे आजमावयाचे होते. देवल, जोगळेकर, मुजूदार, आगाशे, भडभडे, सोरटी व इतर सर्व मंडळींचा उत्तमोत्तम अभिप्राय पडला. भाऊराव कोल्हटकरां-प्रमाणें बालगंधर्व आपले नांव गाजवील व किर्लोस्कर मंडळी उत्तम भरभराटीस येईल असाच एकमतानें सर्वांचा अभिप्राय पडला.

## बालगंधर्व व लोकमान्य.

देशभक्त अच्युतराव कोल्हटकर यांनीं एके वेळीं आपल्या संदेश वृत्तपत्रांत लोकमान्याच्या संबंधानें लिहिलेले मला आठवते. लोकमान्य टिळक म्हणजे फक्त केवळ देशकार्यच करणारी मूर्तिमंत विभूती. लोकमान्य शब्द उच्चारतात, ते केवळ देशकार्याकरतां, लोकमान्य जेवतात—तेही देशकार्याकरतां, लोकमान्य लिहितात—ते देशकार्याकरतां, झोप घेतात तेही देशकार्याकरतां, जागे होतात ते सुद्धां देशकार्या करतांच. सारांश लोकमान्यांच्या आयुष्यांतला प्रत्येक क्षण, प्रत्येक श्वासोश्वास कांहीं तरी देशकार्य केल्याखेरीज लवमात्र फुकट जातच नाहीं. वरील अर्थाचा मजकूर संदेशमध्यें वाचलेला मला आठवतो. लोकमान्यांच्या केसरींतला कोणताही लेख पाहिला तरी तो देशकार्याकरतांच आहे असें आढळून येईल.

**महाराष्ट्र आर्ट स्टुडिओ:--आर्टिस्ट्स् अॅन्ड फोटोग्राफर्स (लॅटर्न स्लाईड स्पेशॅलिस्टस्) आमचेकडे ऑईल पेंटिंग, वॉटर पेंटिंग, पेस्टल, सिपिया व ब्लॅक अॅन्ड व्हाईट एनलार्जमेंन्टस्ची कामें फारच उत्तम व स्वस्त दरांत करून मिळतील.**

**लक्ष्मीरोड बेलबागेजवळ, पुणें शहर.**

नाटक मंडळ्यानीं सार्वजनिक कार्याकरतां आपल्या खेळाचे उत्पन्न धर्मार्थ दिले असेल तरच उत्पन्नाचा आंकडा व नाटक मंडळीचे नांव केसरीत फडकावयाचे याशिवाय कोणतीही नाटक मंडळी चांगली किंवा वाईट आहे, त्यांतील नट उत्तम आहे किंवा मध्यम आहे. याविषयीं केसरीने चुकून सुद्धां चारदोन ओळी खरडल्याचे कोणत्याही केसरीच्या वाचकांस कधीही आढळून आले नसेल.

अशा एकनिष्ट अलौकिक पुण्य पुरुषाच्या (लोकमान्यांच्या) तोंडून त्यांच्या बैठकींत बालपणींच्या-बालनारायण राजहंसाचे बालपणचे-मधुर गाणे कर्णावर पडतांच हा बालगंधर्व आपल्या मोहक गाण्यानें रसिकांचे मन ताबड-तोब आकर्षण करून घेईल असे, स्वयंस्फूर्तिनें लोकमान्यांनीं म्हणावे हें बाल-गंधर्वांचे महत्‌भाग्यच नव्हे काय?

श्री तुकाराम महाराजांनीं परमेश्वर प्राप्तीकरतां सर्व मोहांचा त्याग केला होता म्हणून, तुकाराम महाराजांना भाविक लोक त्यागमूर्ती असें म्हणतात. त्याचप्रमाणें देशकार्याकरतां सर्व मोहांचा त्याग करणारे लोकमान्य, आजकालच्या देशभक्तांना ही ते त्यागमूर्तीच होते असें वाटते. तर अशा ईश्वरी पदाप्रत पोच-लेल्या लोकमान्यांच्या तोंडी बालनारायणाचे गाणे ऐकल्याबरोबर हा "बाल गंधर्व" हे शब्द स्वयंस्फूर्तिनें का आले? तेव्हां एक प्रकारच्या भाविक लोकांच्या मनास असें वाटल्यावाचून राहाणार नाहीं कीं, अणूरेणूंतन वास करणारी गान देवता त्यावेळीं बालराजहंसाच्या पूर्व सुकृतानें अकस्मित तेथें प्रगट झाली असावी व त्या गाण्यानें ती संतुष्ट झाल्यामुळें लोकमान्यांच्या अंतःकरणाच्या आनंदांत प्रविष्ट होऊन एकदम '**तू भूवरचा बालगंधर्व म्हणून सर्वतोमुखी होशील**' अशा प्रकारची पदवीच-नव्हे-तर लोकमान्यांच्या मुखानें गानदेवतेनें **बाल राजहंसास वरच दिला.** अशी कल्पना कोणी केल्यास अप्रस्तुत होईल काय?


# आंजर्लेकर ब्रदर्स.

**आमची खास शिफारसः**-पंचवीस वर्षे खास लोकाश्रयावर सतत चाललेले

**आंजर्लेकर** यांचे **खऱ्या दागिन्याचे दुकान**

तुळशीबागेंतील गणपती समोर, पुणे शहर.

**सोने चांदीचा माल ग्यारंटीनें मिळतो.**

## श्री शाहूछत्रपति, लोकमान्य टिळक आणि श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन मिरज संस्थानचे अधिपति. बालगंधर्वांची प्रथम भूमिका पाहावयास हजर. हा एक विलक्षण योगायोग.

किर्लोस्कर मंडळींत बालगंधर्व प्रथम गुरुद्वादशीच्या दिवशीं राहिले. नाट्याचार्य, अभिनय पटू कै. देवल यांच्या शिक्षणानें शाकुंतल नाटकांतील शकुंतलेची भूमिका ते शिकून तयार झाले. नंतर कांहीं कारणामुळें किर्लोस्कर मंडळींच्या चालकांचे व देवलांचे भांडण झाल्यामुळें कै० देवल किर्लोस्कर मंडळी कायमचे सोडून गेले. कै० देवल निस्पृह व करारी असल्यामुळें आमरण किर्लोस्कर मंडळीत पुन्हा पाऊल ठेवणार नाहीं असा निश्चय करून किर्लोस्कर मंडळी सोडून गेले त्याप्रमाणें ते किर्लोस्कर मंडळींत कधींच परत आले नाहीत. म्हणून श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजूष' नाटकांतील मुख्य स्त्रीपात्राची नंदिनीची भूमिका चिंतोबा दिवेकर ( किर्लोस्कर मंडळीचे देवल मास्तरांच्या गैरहजरीतले नेहमीचे तालीम मास्तर ) यानीं बालगंधर्व यांना शिकविली. ( त्या काळीं कोणत्याही गांवी 'गुप्तमंजूष' नाटक प्रथम लावीत असत कारण त्या नाटकांत सर्व प्रमुख पात्रें रंगभूमीवर आणावी लागत. शिवाय पुढील सर्व नाटकातील सर्व भूमिका मानापमान व विद्याहरण नाटकाशिवाय बालगंधर्वांना चिंतोबा गुरव यांनींच शिकविल्या. किर्लोस्कर मंडळींत ज्या ज्या वेळीं तालमी होत त्या त्या वेळीं तालीम हॉलमध्यें तालीम चालू असतांना चिंतोबा गुरव जे सांगतील तें लहानापासून थोरापर्यंत अर्थात नानासाहेब जोगळेकरांना सुद्धां चिंतोबा गुरव यांचच शिक्षण मिळाले व त्यांनीं ते घेतलेही. मात्र नटवर्य बोडस करूं लागल्यापासून म्हणजे सुमारें १९०१ सालापासून स्वतःच्या भूमिका ते स्वतःच उत्तम रीतीनें तयार करीत असत. नटवर्य बोडस यांना कै० देवल मास्तरांचे उत्तम तऱ्हेचे शिक्षण मिळाले होते. त्याच प्रमाणें बोडस यांच्या पुष्कळ दिवस किर्लोस्कर मंडळींत आधी आलेले चिंतोबा गुरव यांनीं पूर्वींच देवलांचे शिक्षण उत्तम मिळविलें होते. चिंतोबा गुरव यांची महाश्वेतेची

भूमिका भाऊराव कोल्हटकर हयात असतांना फारच उत्तम होत होती. वास्तविक कै० देवल यांचे पट्टशिष्य चिंतोबा गुरव व बोडस उभयताही आहेत. परंतु तालमीच्या वेळीं चिंतोबा गुरव जे शिकवतील ते सर्व शिक्षण इतरा बरोबर बालगंधर्वही घेत होते. म्हणजे विशेषतः अभिनयच बालगंधर्व शिकत होते असे म्हणावयास हरकत नाहीं. तालमी व्यतिरिक्त इतर वेळीं बोडसांचे शिक्षण बालगंधर्व मोठ्या आवडीनें घेत होते. नटवर्य भाऊराव कोल्हटकरांच्या संगीत गायनांतल्या कांहीं मोहक ताना व इतर कांहीं तरकिबी बोडस यांच्या गळ्यांत अगदीं तंतोतंत उतरल्या आहेत. भाऊरावांच्या त्या गायनाच्या तरकिबी बोडसांच्या खुल्या आवाजांत जशाच्या तशा निघत नाहींत. आंतील बारीक गळ्यानें भाऊरावांच्या बहुतेक तऱ्हा बोडस यांच्या गळ्यांतून ऐकण्यास मिळाल्यामुळें त्या तरकिबी आपल्या गळ्यांत उतरविण्याकरितां बोडसांचा बालगंधर्वांनी विशेष सहवास पतकरला होता. ते भाऊरावांचे त्या वेळचे लोकप्रिय संगीत गाणे थोडेंबहूत आपल्या गळ्यांत अभ्यासानें बालगंधर्वांनी त्यावेळीं उतरविलें होतें. त्याचप्रमाणें बोडसांच्या कडून अभिनय शिकण्यास विशेष कांहीं फायदा आहे असे वाटल्यावरून तोही फायदा बालगंधर्व त्यावेळीं नेहमीं घेत होते. अशा प्रकारें बालगंधर्व आपल्या पहिल्या मे० मह्बूबखान गुरूचे गाणे व या दोन देवल मास्तरांच्या पट्टशिष्यांचे अभिनय वगैरेनीं विभूषित झालेली 'गुप्तमंजूष' नाटकांतील नंदीनीची प्रथम भूमिका मिरज मुक्कामीं सरकारी थिएटरांत प्रेक्षकांच्या नजरेस प्रथम पडण्याचा योग आला. त्या दिवशीं आणखी एक विलक्षण योगायोग जुळून आला. किर्लोस्कर मंडळींच्या चालकांच्या निमंत्रणावरून श्री. शाहूछत्रपती महाराज व श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन ( मिरज संस्थानचे अधिपती ) आणि त्याच प्रमाणें लोकमान्य टिळकही प्रयोग पाहाण्यास मुद्दाम येणार होते. नाटक सुरू होण्यापूर्वी थिएटर गच्च भरून गेले होते. परंतु त्यांत विशेषतः श्रीमन्ममहाराज शाहू छत्रपती, व श्रीमंत बाळासाहेब मिरज अधिपती, हे थिएटरांत पुढें मांडलेल्या भरजरी वस्त्रानें सुशोभित केलेल्या कोचावर आपल्या प्रभावळी सहीत बसलेले असल्यामुळें थिएटरांत एक प्रकारची दरबारी शोभा दिसत होती. त्या आनंदाच्या भरांत नाटक सुरू होऊन ईशस्तवन होतांच बालगंधर्वांचे नंदिनीचे पहिले पद सुरू असतानांच लोकमान्य टिळक प्रेक्षकांत

विराजमान झाले. लोकमान्य नजरेस पडतांच प्रेक्षकांनीं टाळ्यांचा कडकडाटांत त्यांचा गौरव केला. लोकमान्यही त्यावेळीं एक दरबारी शिष्टाचार पाळण्यास विसरले नाहींत. तो हा कीं, प्रथम छत्रपतींना त्यांनी मुजरा केला, नंतर श्रीमंत बाळासाहेबांना नमस्कार केला आणि त्यावेळीं त्याच पहिल्या रांगेत लोकमान्यांना बसण्यास जागा केली होती. तरी त्या रांगेत न बसतां मागील रांगेत मोठ्या आदबीनें लोकमान्य एका खुर्चीवर जाऊन बसले. मुजूमदार यांच्या बोलावण्यावरून वरील तिन्हीही महात्मे ज्यावेळीं आंतमध्यें आले त्यावेळीं तिघांनींही किर्लोस्कर मंडळींचा नवा जम पुन्हां पहिल्या थाटांत बसला या बद्दल संतोष व्यक्त केला. म्हणजे हा एक प्रकारें किर्लोस्कर मंडळीस त्रैमूर्ती महात्म्यांचा आशीर्वादच मिळाला असे म्हणण्यास हरकत नाहीं. बालगंधर्वांच्या कामाबद्दल या तीन महात्म्यांनीं उत्तम प्रकारें प्रशंसा केली. या तीन महात्म्यांना तीन प्रकारचा आनंद झाला तो असा:--

लोकमान्यांना आपणच पदवीयुक्त आशीर्वाद दिलेला बालगंधर्व नव्या स्वरूपांत व जिच्या विषयीं आपलेपणा मानीत होतो अशा किर्लोस्कर मंडळींत चमकून दिसला म्हणून आनंद झाला.

श्री शाहू छत्रपतींना, आपण पाठवून दिलेला बालगंधर्व किर्लोस्कर मंडळीचा आधारस्तंभ झाला म्हणून आनंद झाला.

श्रीमंत बाळासाहेब यांना आपल्या मिरजेंत किर्लोस्कर मंडळी नामशेष होणार होती पण तसें न होतां तिचे पुनरुज्जीवन झालें व आता पुन्हां नव्या जोमाने भरभराटीला येईल म्हणून आनंद झाला.

तेव्हां हा सर्व योगायोग विलक्षणच व अपूर्व जुळून आला असें म्हणावयास काय हरकत आहे!

* * * * * *

# बालगंधर्वांची पहिली भूमिका

पुणें म्हटलें म्हणजे कोणत्याही महाराष्ट्रीयाला मातृप्रेमाची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. पुणें म्हणजे कोणत्याही कलाकौशल्याचें व कोणत्याही चळवळीचें उगमस्थान ! असें सर्व महाराष्ट्रीयांना म्हणण्यांत मोठा अभिमान वाटतो. आपल्या अतुलबुद्धिसामर्थ्यानें अलौकिक बुद्धिमान इतर मुत्सद्यांना सुद्धां थक्क करून सोडणारे पेशवाईतील नाना फडणवीस मुत्सद्दीपणाचे राजकीय डाव वेळोवेळीं खेळले तेदेखील पुण्यांतच. लोकमान्य टिळकांसारखा प्रखर, तेजस्वी व मुत्सद्दी देशभक्त पुण्यांतच आपल्या केसरी संस्थेला जन्म देतो. असो. पण तो धामधुमीचा काळ संपल्यानंतर शांततेच्या काळांत आदर्श म्हणून ज्या कांहीं संस्था प्रथम निघाल्या त्यापैकींच केसरी, फर्ग्युसन कॉलेज, नूतन मराठी विद्यालय इत्यादिही पुण्यांतच. केसरी, फर्ग्युसन कॉलेज या संस्थांचा जन्म ज्या १८८० सालांत झाला त्याच सुधारणेच्या शुभकालांत नाट्यकलेचीही सुधारणा झाली. अण्णासाहेबांची किर्लोस्कर संगीत नाटक मंडळी ही संस्था पुण्यांतच जन्मास आली. लोकमान्य टिळक, अण्णासाहेब किर्लोस्करांना आपले मित्र म्हणवीत असत, ही गोष्ट पुणें अगर मुंबई मुक्कामांत ज्या ज्या वेळीं कांहीं सार्वजनिक संस्थांना किर्लोस्कर मंडळीनें आपल्या खेळाचें उत्पन्न मदत म्हणून दिलें, त्या खेळांपैकीं कांहीं खेळांचे वेळीं लोकमान्य टिळक प्रत्यक्ष हजर होते. कंपनीचा गौरव करतांना लोकमान्यांनीं स्वतः बोलून दाखवलेलें कांहीं प्रेक्षकांना आठवत असेलच कीं, अण्णासाहेब किर्लोस्कर माझे स्नेही होते, असा स्वमुखानें लोकमान्य उल्लेख करीत असत. त्यामुळें पुणेंकर रसिक प्रेक्षकांना किर्लोस्कर मंडळी आपलीच आहे असें नेहमीं वाटत होतें. दुसरें कारण असें कीं, उच्च प्रतीचे कवि व नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर वगैरे किर्लोस्कर मंडळीचेच असल्यामुळें, व त्याचप्रमाणें भाऊराव, मोरोबा, बाळकोबा, जोगळेकर, गोरे, चिंतोबा गुरव, बोडस इत्यादि उत्तम नट किर्लोस्कर मंडळीच्या रंगभूमीवरच आपल्या सर्वश्रेष्ठ गुणांनीं चकमकून दिसल्यामुळें पुण्यांतील रसिक प्रेक्षकांना किर्लोस्कर मंडळीविषयीं आपलेपणा व कळकळ वाटत होती. किर्लोस्कर मंडळींतले पहिल्या पिढींतले प्रसिद्ध नट भाऊराव १९०१ सालीं मृत्युमुखीं पडल्यामुळें किर्लोस्कर

मंडळी बंद पडते कीं काय, असें पुणेंकरांना वाटत होतें. परंतु भाऊरावांच्या जागीं जोगळेकर व मुख्य स्त्री नटाच्या जागीं गोरे अशी योग्य जोड मिळाल्यामुळें किर्लोस्कर मंडळीचा नवा जम व नवा थाट पुणेंकरांनीं भाऊरावांच्या मागें जेव्हां प्रथम पाहिला तेव्हां आतां किर्लोस्कर मंडळीला बरींच वर्षें भीति नाहीं, व ही मंडळी नाट्यकलेची व महाराष्ट्रीयांची करमणूक करणार असें वाटून जनतेस फारच आनंद झाला. परंतु तीनचार वर्षांनंतर गोरे स्वदेशहितचिंतक नाटक मंडळीमध्यें भागीदार म्हणून निघून गेल्यामुळें गोऱ्यांच्या गैरहजेरींतल्या दहा महिन्यांची हकीगत पुणेंकर रसिकांना समजली. तेव्हां आतां मात्र किर्लोस्कर मंडळी कायमची बंद पडणार अशी बातमी पुणें येथें पसरली; पण पुढें लवकरच किर्लोस्कर मंडळीस बालगंधर्व नांवाचा बालनट मुख्य नायिकेच्या जागीं मिळाल्यामुळें ऐन वेळीं किर्लोस्कर मंडळीस ही त्रैलोक्यचिंतामणीची मात्राच मिळाली! व पडलेली किर्लोस्कर एकदम नव्या जोमानें उभी राहून मिरज येथें राजमान्य व लोकमान्य होऊन आपला कीर्तिध्वज फडकावीत पुणें येथें येऊन दाखल झाली.

पहिल्या खेळांतलें काम पहाण्याकरितां पुण्यांतील रसिक प्रेक्षक वर्गांत उत्साहानें व उत्कंठेनें खळबळ सुरू झाली. पहिला खेळ शनिवारीं 'गुप्तमंजूष' हा होता. त्यांत बालगंधर्वांचें नायिकेचें काम प्रथम दिसावें म्हणून तीनचार दिवस अगोदर तिकीट विक्री जोरानें सुरू झाली. नाटकाचे आदले दिवशीं म्हणजे शुक्रवार संध्याकाळपर्यंत तिकिटविक्रीचा सर्व 'तक्ता' खलास होत आला. या आनंदाच्या लाटा किर्लोस्कर मंडळींतल्या प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत आनंदानें खळबळ करूं लागल्या. आजची रात्र जाऊन उद्यांची आनंदाची रात्र सुरू होऊन सर्व आनंदित प्रेक्षकांच्या चिकार भरलेल्या थिएटरांत आपला खेळ केव्हां सुरू होतो असें ज्याला त्याला उत्कंठेनें वाटूं लागलें होतें. ज्याच्या त्याच्या डोळ्यांपुढें प्रेक्षक आनंदाच्या भरांत उद्दीपक बालगंधर्वांना व इतर नटांना टाळ्या देतांना दिसताहेत असें चित्र कल्पनाचक्षूंना दिसत होतें. शुक्रवार रात्रीची जेवणाची घंटा झाली. सर्व मंडळी आनंदानें जेवली. बालगंधर्वही आनंदानें जेवले. ( फक्त श्री० मुजुमदार व जोगळेकर पुणें येथील आपआपल्या बिऱ्हाडीं जेवणास

व झोपण्यास गेले होते ), सर्व मंडळी आपापल्या जागीं निजावयास गेली. बालगंधर्वही कंपनीच्या अण्णासाहेबांच्या हॉलमध्यें त्यांच्या करतां टाकलेल्या गादीवर, फॅन्सी गजरेदार अभ्र्यांनीं आच्छादलेल्या उशा डोक्याखालीं घेऊन आनंदानें निजले होते. डोळ्यांस त्रास होऊ नये म्हणून, व झोंप लौकर लागावी म्हणून हॉलमधील दिवा बारीक केल्यामुळें किंचित् अंधार पसरला होता, व सर्वत्र शांतता पसरली होती. ( या वेळीं कंपनी जुन्या आर्भूषण थिएटरांत खेळ करण्याकरितां आली होती व त्याच थिएटरांत मंडळी राहण्याकरतां जी जागा केली होती, त्यांतच सर्व मंडळी राहिली होती. सुमारें मध्यरात्रीचा सुमार होता; इतक्यांत खालीं दरवाजावर कोणी मोठ्यानें थाप मारली व ' नारायण, नारायण' अशी जोरानें हांक मारली. ती हांक ऐकतांच कंपनींतील एका मनुष्यानें दार उघडलें. दार उघडणाऱ्या मनुष्यास दारावर थाप मारलेल्या मनुष्यानें विचारलें. " तुमच्या कंपनींत आमचा नारायण राजहंस आहे काय ? " कंपनींतील मनुष्यानें 'होय' असें उत्तर दिलें. त्या मनुष्यानें कंपनींतील मनुष्यास सांगितलें, " माडीवर जा आणि नारायणाला सांगा कीं, तुला भेटण्यास तुझ्या वडील माणसांपैकीं खालीं एक गृहस्थ आले आहेत आणि तुला ताबडतोब भेटण्यास बोलाविलें आहे. नारायणाला झोंप लागली असली तरी ताबडतोब जागें करून माझ्या पुढें हजर करा ! "

त्या गृहस्थाचे हे शब्द ऐकतांच कंपनींतील नोकर ताबडतोब वर गेला, व झोपेच्या गुंगींत असलेल्या बालगंधर्वांना हलवून जागें करून त्या गृहस्थाचा निरोप जशाचा तसा कळवला. या वेळीं बालगंधर्व अंथरुणावरून ताड्कन् उठले व लगबगीनें जिना उतरून खालीं गेले. त्या गृहस्थांस त्यांनीं ओळखलें व प्रेमळ आवाजानें " मामा, तुम्ही पुण्यांत केव्हां आलांत ? व इतक्या रात्रीं मला बोलवायला कां आलांत ? " असा प्रश्न केला.

बालगंधर्वांचे मामा यावेळीं शारदा नाटकांतल्या चौथ्या अंकांतल्या शारदेच्या मामाप्रमाणें गरम होऊन चवताळून आले होते. त्यांनीं एकदम बालगंधर्वांच्या मुस्कटींत भडकावली आणि रागाच्या भरांत आणखी पांच दहा थपडा

मारून ते रागानें म्हणाले, " कार्ट्या, नाटकांत जाऊन तोंडाला रंग लावून स्त्रीवेष घेऊन राजहंस कुळाला बट्टा लावलास ? " त्यावर रडत रडत बालगंधर्व म्हणाले, " मामा, आईच्या व भाऊंच्या ( वडील ) परवानगीनेंच मी नाटकांत शिरलों. " पण मामांनीं बालगंधर्वांचें बोलणें पुढें ऐकून न घेतां फरपटत ओढून घेऊन चालूं लागले व म्हणाले, " या बाबतींत तुझ्या आईबापांचें मी मुळींच ऐकणार नाहीं. चल माझ्याबरोबर. मी तुला जिकडे नेईन तिकडे चल. उदईक पुण्यांत तुझें रंगलेलें तोंड मी कोणालाही दिसूं देणार नाहीं. " या आरडाओरडीच्या गडबडीमुळें बालगंधर्व व त्यांच्या मामांच्या भोंवतीं खूपच गर्दी जमली. इकडे मामांना दार उघडणारा कंपनींतील नोकर घाबऱ्याघाबऱ्या माडीवर धांवत गेला, व मंडळींना जागें करून बालगंधर्वांच्या व त्यांच्या मामा संबंधानें घडलेला सर्व प्रकार सांगितला. मंडळी खडबडून जागी झाली व खालीं धांवत आली. रस्त्यावर गर्दी बरीच होती; पण त्या गर्दींत बालगंधर्व त्यांचे मामा कोठें बेपत्ता झाले तें कोणासही माहीत नव्हतें. लागलीच मंडळी मुजुमदार व जोगळेकर यांचे घरीं गेली बालगंधर्व व त्यांचे मामा नापत्ता झाल्याची व इतर सर्व हकीगत सांगितली.

## आज बालगंधर्व रंगले नाहींत तर ?

शुक्रवार रात्रीं सुमारें बारा वाजतां श्री. शंकरराव मुजुमदार व जोगळेकर यांचे घरीं बालगंधर्व बेपत्ता झाल्याची बातमी पोंचली. ही बातमी कळतांच शंकरराव मुजुमदार व जोगळेकर टांग्यांतून कंपनीच्या बिऱ्हाडीं आले. कंपनींतील सर्व मंडळी जागीच होती. परंतु सर्व कंपनीभर एकप्रकारची उदासीनता पसरली होती. जोगळेकर तर एकप्रकारें घाबरूनच गेले होते. परंतु शंकरराव मुजुमदार मात्र धीरोदात्त, अत्यंत हुषार खरे ! त्यांनीं जोगळेकर व इतर सर्व मंडळींना सांगितलें कीं, " कांहीं घाबरूं नका. कितीही दुष्कर व भगीरथ प्रयत्न करावा लागला तरी मी तो करीन; परंतु उदईक होणारा पहिला खेळ बालगंधर्वांसहित पुण्यांत केल्याशिवाय रहाणार नाहीं." असें म्हणून मुजुमदार तावडतोब बालगंधर्वांना शोध-

त्याचा प्रयत्न निकरानें करूं लागले. कंपनींतील कांहीं विश्वासु मंडळींना ताबड-तोब तांगे करून पुणें, घोरपडी, हडपसर व खडकी या स्टेशनांवर रवाना केलें. " वाटेल तें करा; परंतु बालगंधर्वाला जर कोणीं रेल्वेंत बसवून बाहेर गांवीं नेण्याचा प्रयत्न करील तर, त्यांना तसें न करूं देतां तावडतोब तिथेंच थोपवून धरा, व ती बातमी विद्युत् वेगानें मला कळवा. " असें त्यांना सांगण्यांत आलें होतें. इतकें करून शंकरराव मुजुमदार स्वस्थ राहिले नाहींत; तरपुणें शहरांत बालगंधर्वांचे नातेवाईक, स्नेहीसोबती व चहाते असे जे जे सद्गृहस्थ असतील त्यांच्या त्यांच्या घरीं स्वतः टांगा करून बालगंधर्वांचा शोध करीत शनिवारचा दिवस उजाडेपर्यंत सारखे भटकत राहिले. अखेर बालगंधर्व ज्या वाड्यांत होते, त्या वाडयांत जाऊन त्यांची त्यांनीं भेट घेतली. त्यांना शोधून काढीपर्यंत मुजु-मदार यांना व सर्व मंडळींना फारच त्रास झाला. शेवटीं पुण्यांतल्या कांहीं सद्गृहस्थांचें वजन बालगंधर्वांच्या मामांच्या मनांवर घालून, किर्लोस्कर मंडळीं-तच बालगंधर्व राहतील तर त्यांचा लौकिक किती मोठा वाढेल, व त्याचप्रमाणें द्रव्यदृष्टयाही त्यांचा अतोनात फायदा होईल ही गोष्ट मामांच्या मनावर उत्तम रीतीनें बिंबवून दिली. परंतु मुख्यतः बालगंधर्वांच्या हुशार व समंजस मातोश्रींचें मत आधींच अनुकूल होतें. त्यांचा दृढनिश्चय रतिभरही ढळला नाहीं. बालगंधर्वही मातोश्रींच्याच प्रमाणें दृढनिश्चयी होते. म्हणूनच मुजुमदारांच्या या वेळच्या सर्व प्रयत्नांना शुभ यश लाभलें.

सर्वांची समजूत होतांच बालगंधर्वांना किर्लोस्कर मंडळीच्या बिऱ्हाडीं आण-ण्यांत आलें. अर्थात् मंडळींत सर्वत्र आनंदीआनंद पसरला व प्रसिद्ध झाल्याप्रमाणें पुणें मुक्कामांतील किर्लोस्कर मंडळीचें पहिलें 'गुप्तमंजूष' नाटक सर्वप्रकारें सर्वो-त्कृष्ट असें झालें. प्रेक्षकांचीही चिकार गर्दी झाली होती. बालगंधर्वांच्या व जोगळे-करांच्या कित्येक पदांना वन्समोअर व टाळ्यांचा सारखा गजर होत होता. अशा-प्रकारें सुरुवातीपासून नाटक उत्तम रंगल्यामुळें शेवटचा ड्रॉप पडतांच हजारों प्रेक्षक मोठ्या आनंदानें थिएटरच्या बाहेर पडले व आपसांत बोलूं लागले कीं, किर्लोस्कर मंडळीला बालगंधर्व हा मुलगा ऐनवेळीं मिळण्याचा जो लाभ झाला, तो अपूर्वच होय ! बालगंधर्वांच्या रूपानें साक्षात् रंगदेवता आणि लक्ष्मीच किर्लोस्कर मंडळीला लाभली असें म्हणावयास हरकत नाहीं.

कालच्या अपरात्रीं बालगंधर्व बेरत्ता झाले, म्हणून आज बालगंधर्व रंगले नाहींत तर सर्व पुणें शहरांत किर्लोस्कर मंडळीची फजिती उडणार ही सर्व मंडळींची काळजी दूर झाली. किर्लोस्कर मंडळींत आज खेळ संपतांच सर्वत्र आनंदी-आनंद पसरला.

## बालगंधर्वांना अपशकून.

### का रंगभूमीनें शुभ कौल दिला ?

पुणें येथील यशस्वी मुक्काम संपवून किर्लोस्कर मंडळी नगर मुक्कामीं गेली. तेथें नेहमींप्रमाणें खेळ सुरू झाले. परंतु 'मूकनायक' नाटकांतील सरोजिनीची भूमिका बालगंधर्व करीत असतांना दुसऱ्या अंकांतील सरोजिनीच्या पदांच्या ऐन गाण्याच्या रंगाच्या वेळीं "अवचित गेले किंकर करिं मी" हें पद बाल-गंधर्व म्हणत असतांना त्या पदांत अंतऱ्याच्या वेळीं एखादें मशीन फिरल्याप्रमाणें त्यांच्या गळ्यांतून मधुर ताना गरगर फिरत होत्या. अर्थात् सर्व प्रेक्षकांना आनंद झाल्यामुळें ते आनंदानें टाळ्यांवर टाळ्या पिटीत होते. त्या टाळ्यांच्या ऐन कडकडाटाच्या वेळीं, व तानांच्या ऐन रंगाच्या वेळीं बालगंधर्वांचा टोप व गंगावनाचा बुचडा सुवासिक फुलांच्या वेणीसह खालीं पडला! ( बालगंधर्व त्या वेळीं किर्लोस्कर मंडळींत राहून थोडेच दिवस झाले असल्यामुळें स्त्रीपार्टाला साजतील असे अंगचे डोक्याचे केस नव्हते. बालगंधर्वांच्या डोक्यावर फार तर बोटबोटच केस वाढले होते. म्हणून त्या वेळीं त्यांना जुन्या पद्धतीचा केंसांचा टोप व गंगावन घालावें लागत असे. त्या दिवशीं तो टोप चांगला बांधला गेला नसल्यामुळें अर्थातच ऐन वेळीं फुलांच्या वेणीसहित तो खालीं पडला. ) झालेल्या प्रकारामुळें, बालगंधर्व किंचित्‌ही गांगरले नाहींत. उलट मोठ्या शिताफीनें शालूचा खांद्यावरचा पदर त्यांनीं डोक्यावर घेतला. आंतील अंगच्या छोट्या केंसांचा भांग चापूनचोपून बसलेला होता. त्यामुळें, पुष्कळशा प्रेक्षकांच्या ध्यानांत टोप पडल्याची गोष्ट आलीच नाहीं. बालगंधर्वांनीं तें पद व त्या

व त्यापुढील दोन्ही पदें उत्तम म्हटलीं. त्या तिन्हीं पदांस वन्समोअरच्या टाळ्या झाल्या. तो प्रवेश संपवून बालगंधर्व आंत आले. आंतील कंपनीच्या मंडळींच्या लक्षांत मात्र टोप पडल्याची गोष्ट तावडतोब आली होती. त्या प्रसंगीं एक दोन माणसें आपापसांत कुजबुजून भाविकपणानें एकमेकांत म्हणालीं कीं, 'बालगंधर्वांना हा अपशकून झाला. हा मुलगा तावडतोब स्त्रीपार्टीतून नालायक होऊन नाटकधंद्यांतून निघून घरीं बसेल. असें तरी या अपशकुनानें सुचविलें नसेल ना ?'

भाविक माणसांच्या कांहींही कल्पना असोत; परंतु जगाच्या इतिहासांत भाग्यवान पुरुषांच्या संबंधानें त्यांना होणाऱ्या अपशकुनांचें फल एकाद्या नाटकांतील जंगलचा महाल होणाऱ्या ट्रॅन्स्फर सीनप्रमाणें शुभफल देण्यांतच कधीं कधीं आढळून आल्याचें दिसून येतें.

याविषयीं भाग्यवान् चक्रवर्ति नेपोलियनची एक गोष्ट मी ऐकली होती, ती येथें जशीच्या तशी वाचकांना सादर केल्यास अप्रस्तुत होणार नाहीं. असें वाटतें.

चक्रवर्ति नेपोलियन लढाई चालू असतां आपल्या कांहीं निवडक सैनिकांसह कोणतासा एक महत्त्वाचा किल्ला जिंकण्याकरतां मोठ्या उत्साहानें त्या किल्ल्याकडे जाण्यास निघाला तोंच किल्ला आपल्या ताब्यांत घेण्याकरितां व त्या किल्ल्याचा आश्रय घेण्याकारतां प्रतिपक्षाचें सैन्य लांबून मोठ्या जोरानें व झपाट्यानें त्याच किल्ल्याकडे जावयास निघालें होतें. ती वेळ अशी आणीबाणीची होती कीं, ज्या पक्षाचें सैन्य प्रथम किल्ल्यांत शिरेल व किल्ला हस्तगत करील तो पक्ष प्रबल होईल. कारण किल्ल्याचा आश्रय सैन्याला मिळाल्यामुळें आंतील सैन्य तटाच्या आडून बाहेर असलेल्या सैन्यावर गोळ्या झाडणार ! अर्थात् बाहेरील सैन्य गारद व निर्बल करावयाला किल्ल्याच्या आंतील सैन्याला अर्थात् सोपें जाणार.

अशा महत्त्वाच्या किल्ल्याचा आश्रय करण्याकरितां किंवा किल्ला जिंकण्याकरतां नेपोलियनचें सैन्य नेपोलियनसह एका बाजूनें व प्रतिपक्षाचें सैन्य दुसऱ्या बाजूनें, अर्थात् दोन्हीं पक्षांचें सैन्य त्या किल्ल्याकडे झपाट्यानें येत होतें. नेपोलियन

आपल्या निवडक सैन्यांसह तो किल्ला दुरून दिसेल इतक्या जवळ भरधांव घोडा फेकीत आला. त्या वायुवेगाच्या घोड्याच्या धावण्यामुळें नेपोलियन घोड्यावरून जमीनीवर मातींत खालीं पडला. हा प्रकार पाहिल्याबरोबर नेपोलियनचे निवडक सैनिक एकदम थबकले, व भाविकपणामुळें सर्वांना वाटलें कीं, नेपोलियनला हा अपशकून झाला, व त्यामुळें सर्व सैनिकांचें धैर्य खचलें. परंतु भाग्यवान् पुरुष कमकुवत मनाचे मुळींच नसतात. शकून-अपशकून त्यांच्या ध्यानींमनींही नसतात. ते आपल्या कार्यांत गढून गेलेले असतात. त्यामुळें त्यांचें मन आनंदित व प्रफुल्लित असेंच सदोदित असतें. भाग्यशाली नेपोलियन घोड्यावरून मातींत पडला खरा पण तीच माती दोन्ही हातांत घेऊन प्रफुल्ल मुद्रेनें उठून उभा राहिला व सैनिकांना म्हणाला, "हा मला अत्यंत शुभशकून झाला. ही भूमि माझ्या मुठींत आली. तर चला लौकर किल्ला हस्तगत करूं या; आतां आपल्याला जय खास मिळणार." त्याप्रमाणें तो किल्ला खरोखरीच नेपोलियनच्या हस्तगत झाला. अर्थात् घोड्यावरून मातीत पडल्यामुळें त्याच्या मुठींत आलेली माती हा अपशकून असें जरी लोकांना वाटलें तरी, ट्रॅन्स्फर सीन बदलला त्याप्रमाणें तो किल्ला नेपोलियनच्या ताब्यांत आला.

त्याचप्रमाणें बालगंधर्वांच्या डोकीवरील टोप खालीं पडला ही गोष्ट भाविक लोकांना अपशकून झाल्यासारखी वाटली, व त्यांनीं तसें उद्गार काढले; पण भाग्यशाली बालगंधर्वांच्या मनाला, त्यावेळीं शकून-अपशकून यत्किंचित्‌ही वाटला नाहीं. उलट त्यांच्या पुढील यशाला तो एक शुभ कौलच होय असें म्हणावयास हरकत नाहीं. बालगंधर्वा, तूं दीर्घायु होऊन तुझ्या डोक्याचे केंस गळून पडेपर्यंत तूं रंगभूमीची सेवा करशील. यावेळीं तुझ्या डोक्यावरील टोप पडला असतांनासुद्धां रंगदेवतेची तुझ्यावर कृपा असल्यामुळें प्रेक्षकांना जसें तूं यावेळीं रंगवून सोडलेस त्याचप्रमाणें तुझ्या डोक्यावरील केंस गळून पडले तरी तूं प्रेक्षकांना रंगदेवतेच्या कृपेनें रंगवूनच टाकशील!

# मुंबईवर पहिली मोहीम !

नगरचा मुक्काम आटोपून मध्यंतरीं नाशिक घेऊन किर्लोस्कर मंडळी मुंबईस येऊन थडकली. मुंबईचा मुक्काम बरेच दिवस आपल्याला लाभावा अशी शंकरराव मुजुमदार यांची इच्छा होती. परंतु मंडळी-जवळ या वेळीं चांगल्या नाटककाराचें एकादें नवीन नाटक नाहीं म्हणून ही गोष्ट घडणें अशक्य आहे असें मुजुमदारांना मुंबई येथें कंपनी येतांच वाटलें. दुसरी अडचण किर्लोस्कर मंडळीजवळ असलेल्या त्या वेळच्या पंधरावीस नाटकांत बालगंधर्वांच्या मुख्य नायिकेच्या भूमिका तयार व्हावयाच्या होत्या. फार तर पांच किंवा सहा नाटकांत बालगंधर्व मुख्य नायि-केच्या भूमिका करीत होते. क्रमाक्रमानें सर्व नाटकांत बालगंधर्व यांनाच नायिकेचीं कामें देण्याचा क्रम चालू होता. परंतु चार-सहा महिन्यांतच पंधरा-वीस नाटकांतील कामें त्यांना बसणें शक्य नव्हतें हें उघड आहे. कंपनीचे खेळ सुरू होतांच प्रथमपासूनच कंपनीला पैसा उत्तम मिळूं लागला. परंतु ज्या ज्या खेळांत बालगंधर्व काम करणार नाहींत असें दिसून येई, त्या त्या खेळांना प्रेक्षक नाराज होऊं लागले; व बालगंधर्वांची आज भूमिका आहे किंवा नाहीं याची खात्री करून घेऊनच पुष्कळसे लोक नाटकाचीं तिकिटें विकत घेत असत. प्रेक्षक खात्री करून घेत असत असें लिहिण्याचें कारण त्या वेळींचें काय. परंतु किर्लोस्कर मंडळीच्या आरंभापासून आजच्या नाटकांत अमुक प्रमुख नट अमुक काम करणार आहे, असें हस्तपत्रकांत लिहिण्याची किर्लोस्कर मंडळीची केव्हांही वहिवाट नव्हती. कारण किर्लोस्कर मंडळीच्या आरंभापासून सर्व नट आपआपल्या जागीं अगदीं सर्वतोप्रकारें योग्य असेच असत. म्हणून एखाद्दुसऱ्या नटाचें नांव हस्तपत्रकांत जाहीर करून त्यालाच तेवढें महत्त्व देणें म्हणजे, कंपनींतील इतर नटांना नालायक ठरवून त्यांचा अपमान करणें होय; व याच कारणामुळें ही गोष्ट किर्लोस्कर मंडळीच्या चालकांना आवडत नव्हती.

बालगंधर्वांच्या कामावर प्रेक्षक खुष आहेत ही गोष्ट त्या वेळीं त्यांच्या जागीं कामें करणाऱ्या एकदोन नटांना आवडत नव्हती, अशी किर्लोस्कर मंडळींत बोलवा होती. त्या वेळीं एक नट कांहीं खाजगी कामाकरतां रजा घेऊन घरीं गेला. तो वेळेवर येईल किंवा नाहीं अशी रा० मुजुमदारांना

वराल बातमीमुळें शंका होती. म्हणून त्यांनीं 'सौभद्र' नाटक मुंबई येथें प्रेक्षकांना फार आवडलेलें पाहातांच पुन्हा तोच प्रयोग लावला. तरी 'सौभद्र' नाटक नव्या नाटकाप्रमाणें रंगलें व उत्पन्नही खूप झालें. तेव्हां मुख्य वारीं 'सौभद्र' नाटक व मधल्या वारीं बालगंधर्वांचें ज्यांत काम आहे अशीं नाटकें लावण्याचा रा० मुजुमदारांनीं क्रम सुरू केला. रा० मुजुमदारांनाही अपूर्व यश आलें. त्या वेळीं त्या मुक्कामांत 'सौभद्र' नाटकाचे सुमारें वीस-बावीस प्रयोग झाल्याचें मला आठवतें. भाऊरावांच्या नंतर सुभद्रेच्या भूमिकेला बालगंधर्वांच्यामुळें अगदीं नवा रंग आला. भाऊरावांच्या गाण्याची पद्धत जरी लोकप्रिय होती, तरी बालगंधर्वांची कवाली गाण्याची पद्धत, व त्यांच्या भरदार लांब लांब ताना एका दमांत पुष्कळ वेळ लांबवतांना ऐकून प्रेक्षकगण आनंदानें टाळ्यांचा कडकडाट करीत असे. निवडक पदांना वारवार, सहासहा वेळ 'वन्स मोअर' देऊन बालगंधर्वांना पुनः पुन्हा म्हणायला लावीत असें. मागील पिढींतील भाऊरावादि नट यांचीं संगीत पदें ऐकून लोक आनंदानें पुष्कळ वेळां 'वन्स मोअर देऊन त्यांनाही पुनः पुन्हा पदें म्हणावयाला लावीत असत हें खरें; परंतु बालगंधर्वांच्या पदाच्या वेळीं प्रेक्षकांनीं आनंदातिरेकानें व स्वयंस्फूर्तीनें पदें चालू असतां एक नवीनच उपक्रम सुरू केला. तो असा--

बालगंधर्व एका दमांत तानांचें चक्र सुरू करूं लागले कीं सर्व थिएटर टाळ्यांच्या कडकडाटानें दुमदुमून जावयाचें. बालगंधर्वांनीं पदांत एकादी गोड नवीन लकेर घेतली, कीं प्रेक्षकांकडून टाळ्यांचा कडकडाट व्हावयाचाच. गातांना त्यांनीं टिपेच्या षड्जावर सूर लावला कीं, टाळ्यांचा कडकडाट प्रेक्षकांकडून व्हायचाच. पद चाललें असतांना मधून मधून गोड आलापांना, गोड सुरांना, गोड तरकिबींना टाळ्यांचा कडकडाट आनंदानें होण्याचा उपक्रम बालगंधर्वांच्या नवीन संगीतापासूनच सुरू झाला. हा प्रेक्षकांकडून गाण्यांतला नवा मान प्रथम बालगंधर्वांनाच मिळाला.

'सौभद्र' नाटक पुन्हा नवें झालें, याचें मुख्य श्रेय बालगंधर्वांनाच देणें जितकें योग्य आहे तितकेंच, कै० जोगळेकर व नटवर्य बोडस यांनाही देणें अत्यंत जरूर आहे.

किर्लोस्कर मंडळीचा प्रेक्षकवर्ग म्हणजे एकजात सुशिक्षित व समाजांतील उच्च दर्जाचा असल्यामुळें, व त्याची व्यवस्था किर्लोस्कर मंडळीचे मुख्य मॅनेजर रा० शंकरराव मुजुमदार उत्तम ठेवीत असल्यामुळें सुरवातीपासून शेवटपर्यंत नाटक सर्वच दृष्टीनें अत्यंत थाटाचें होत असे.

सारांश, मुंबईची पहिली मोहीम फारच यशस्वी व उत्तम झाली. किर्लोस्कर मंडळीजवळ नवें नाटक नसतांना फक्त एकाच 'सौभद्र' नाटकावर मुंबईचा मुक्काम पार पाडला. यावरून सौभद्र नाटकाची लोकप्रियता किती होती याची कल्पना वाचकांनींच करावी. पण या प्रसंगानें किर्लोस्कर मंडळीच्या चालकांच्या हें नजरेस आलें कीं, आपलें सौभद्र नाटक पुन्हा नवें झालें, सौभद्र नाटकाला पुन्हा नवा थाट आला. प्रेक्षकांना तें कित्येक वर्षे आवडल व आपणही या नाटकावर पुष्कळच पैसा व कीर्ति मिळवूं असा किर्लोस्कर मंडळीच्या चालकांनाही विश्वास वाटूं लागला.

## बालगंधर्वांचा आज्ञाधारकपणा !

किर्लोस्कर मंडळी सुरू होऊन सुमारें पंचवीस वर्षे झाल्यानंतर बालगंधर्व किर्लोस्कर मंडळींत राहिले. ते राहण्यापूर्वी किर्लोस्कर मंडळींतील अगर त्या काळच्या कोणत्याही नटांना नाटकाच्या दिवसांखेरीज समाजांत किंवा बैठकींत खाजगी गाण्याकरितां बोलावण्याची वहिवाट नव्हती. समाजांत कांहीं विशिष्ट आनंदाच्या प्रसंगीं बैठकींत गाण्याचा मान घरंदाज व नांवाजलेल्या गवयांनाच मिळावयाचा. नाटकांतल्या नायकांना किंवा नायिकेला (बैठकींत पहिल्या पंचवीस वर्षांत) बैठकीचें गाणें येत नसल्यामुळें तो मान या नटांना मिळत नव्हता. (कै० बाळकोबा नाटेकर मात्र बैठकीचें व संगीत गाणें बैठकींत गाण्यास समर्थ होते.) बालगंधर्व कंपनींत येतांच त्यांना मात्र बैठकींत गाण्याकरतां बोलावण्याचा नवीन उपक्रम सुरू झाला. त्यामुळें नाटकाचे रात्रीखेरीज निरनिराळ्या समाजांत हरएक प्रसंगीं बालगंधर्वांना गाण्याचा प्रसंग येत असे व त्यामुळें आणखी एकप्रकारें त्यांच्याबद्दल लोकांमध्यें प्रेम उत्पन्न होऊं लागलें. पुणें येथील डेक्कन कॉलेज, फर्ग्युसन कॉलेज, नूतन मराठी विद्यालय वगैरे शिक्षणविषयक

संस्थांतून बालगंधर्वांचीं वेळोवेळीं खाजगी गाणीं होत असत व त्याबद्दल त्यांना पारितोषकही योग्य असें मिळत असे. पुण्याप्रमाणे मुंबई, नागपूर इत्यादि मोठमोठ्या शहरांतूनसुद्धां बालगंधर्वांचीं खाजगी गाणीं होत असत, व त्यांना मोठा मानही मिळत असे. परंतु किर्लोस्कर मंडळीच्या चालकांना असें आढळून आलें कीं, बालगंधर्वांच्या वेळोवेळीं होणाऱ्या खाजगी गाण्यांमुळें नाटकाचें उत्पन्न मर्यादित होऊं लागलें आहे. कारण ज्या ज्या संस्थेंत त्यांचें गाणें होत असे, तेथें तेथें फुकट ऐकायला कोणालाही मज्जाव नव्हता. बक्षिसाचा खर्च प्रमुख मंडळी करीत असतील; परंतु त्यांचे इष्टमित्र व इतर बाजारबुणगे शेंकडोंच काय, पण हजारों जमत होते. याविषयीं किर्लोस्कर मंडळीच्या चालकांची खात्री होतांच चालकांनीं बालगंधर्वांना हुकूम फर्मावला कीं, 'यापुढें आमच्या परवानगीशिवाय तूं कोठेंही खाजगी गाण्यास जाऊं नको.' मालकांची अशी आज्ञा होतांच बाल-गंधर्वांनीं तावडतोब तो हुकूम पाळला. "समाजांतून मिळणाऱ्या खाजगी मानाला व बक्षिसाला आपण आजपासून मुकलों" असें उद्‌गार त्यांनीं मालकांच्या समोर अगर त्यांच्या मागें कोणाजवळही काढल्याचें ऐकिवांत नाहीं. किंवा या नुकसानीबद्दल त्यांना यत्किंचित् दुःख झाल्याचेंही कोणाला दिसून आलें नाहीं.

वरील हुकुमानंतर कधीं काळीं कोणत्या संस्थेकडून खाजगी गाण्याचें बोलावणें आलेंच तर बालगंधर्व स्पष्ट सांगत कीं, "नानासाहेब जोगळे-करांचा हुकूम तुम्ही काढा व त्यांनीं मला आज्ञा दिली तरच मी गाण्यास येईन."

याबाबतचें एकच उदाहरण येथें नमूद केलें तरी पुरें आहे. पुणें येथील डेक्कन कॉलेजांतील विद्यार्थ्यांकडून बालगंधर्वांना गाण्याचें निमंत्रण प्रसिद्ध अनुकरणपटु श्री० भोंडे यांच्यातर्फे ज्या वेळीं आलें, त्या वेळीं बालगंधर्वांनीं "नानासाहेबांची परवानगी काढा म्हणजे मी येतों" असेंच उत्तर दिलें. त्या वेळीं कै० नानासाहेब जोगळेकर सुद्धां स्वतः अशी शिस्त पाळीत असत कीं, रा० शंकरराव मुजुमदारांच्या संमतीशिवाय आपल्या मालकीच्या जोरावर नवीन काढलेला हुकूम स्वतःही कधींच मोडीत नसत.

त्या प्रसंगाची श्रीयुत नारायणराव, कै० जोगळेकर व श्री० मुजुमदार या त्रिवर्गांची एक श्री० भोंडे यांची नक्कल प्रसिद्धच आहे.

सदर गोष्टींत मानाचें व द्रव्याचें नुकसान सोसून किर्लोस्कर मंडळीच्या मालकांच्या आज्ञेंत बालगंधर्व कसे वागत होते हें विशेषतः दिसून येईल.

## बक्षिसें परत ! कां ?

किर्लोस्कर मंडळीचा मुक्काम पुणें येथें असतांना कॉलेजमधील एका श्रीमंत विद्यार्थ्यानें बालगंधर्वांच्या गुणावर खुष होऊन दोन ट्रंका भरून अपटुडेट व भारीभारी कपडे-कोट, जाकीट, पाटलोण, शर्ट इत्यादि कपडे बालगंधर्वांच्याकडे 'मी हें तुम्हांला बक्षीस दिलें आहेत' म्हणून पाठविले. ( बालगंधर्व डेक्कन कॉलेजमध्यें ज्या वेळीं गाण्याकरितां गेले होते, त्या वेळीं त्यांच्या अंगचें माप उत्तम शिंप्याकडून सहज रीतीनें घेतलें होतें, असें ऐकिवांत आहे. ) त्या ट्रंका ज्यांनीं आणल्या होत्या, त्यांनींच उघडून सर्व कपडे त्यांना दाखविले. परंतु बालगंधर्वांच्या मनांत त्या वेळीं यत्किंचितही मोह उत्पन्न झाला नाहीं. उलट त्यांनीं असा निरोप पाठविला कीं, "सदर बक्षीस शिष्टसंप्रदायाला सोडून असल्यामुळें मला तें नको." असें म्हणून त्यांनीं सर्व कपडे ट्रंकांसहित परत केले.

## एक आख्यायिका.

कोणा एका श्रीमंत गृहस्थांच्या घरीं ओळख झाली होती म्हणून बालगंधर्व सहज त्यांचेकडे गेले असतां, ते श्रीमंत गृहस्थ बालगंधर्वांना बोलतां बोलतां म्हणाले, 'हा भरजरी शालू तुम्ही नेसा. एरव्हीं तुम्ही-म्हणजे रंगल्याशिवाय-किती उत्तम दिसतां हें मला पहावयाचें आहे.'

सदर श्रीमंत गृहस्थ कोणत्याही सद्हेतूनें म्हणोत; परंतु त्या भोळ्या अल्पवयी नारायणाला ही कल्पना कशीशीच वाटली. व ताबडतोब त्या

घरांतून उठून जाऊन आपला नाराजीचा मनोदय त्या गृहस्थांच्या नजरेस त्यांनीं सक्रियपणें आणला.

सदर एक दोन गोष्टींच्या उदाहरणांवरून अल्पवयांत व नोकरींत असतांना सुद्धां, बालगंधर्व किती उच्च मनाचे होते हें चांगल्या प्रकारें दिसून येईल.

## बालगंधर्व दोन तास गडप !

बालगंधर्व किर्लोस्कर मंडळींत आल्यापासून आतांपर्यंत त्यांना नाटक-धंद्यांत एकंदर तीस वर्षें झालीं. एवढ्या अवधींत त्यांच्या निकटच्या सहवासांतल्या माणसांनासुद्धां त्यांच्या नेहमींच्या खाजगी वागणुकींत ते एखाद्या अवलियाप्रमाणें आहेत, असेंच (बहुतेकांना) वाटतें. ते पूर्वजन्मींचे कोणीतरी शापित योगी असावेत असेंही वाटल्यावांचून राहात नाहीं. दररोजच्या नित्यक्रमाची त्यांची डायरी रा० दादा लाडू यांनीं विनोदी शब्दांत लिहिली आहे; त्यावरून व एरव्हींच्या एकंदर वागणुकीवरून या विधानाला पुष्टीच मिळते.

किर्लोस्कर मंडळीचा मुंबईस मुक्काम होता त्या वेळीं बालगंधर्वांचे वडील थोडे दिवस मंडळींत येऊन राहिले होते. बालगंधर्वांचे वडील अगदीं भोळे होते,-किंवा वयोमानामुळें त्यांचा भोळेपणा अधिक दिसत होता असें म्हटलें तरी चालेल. एके दिवशीं सकाळीं नऊ-दहा वाजण्याच्या सुमारास बालगंधर्वांचे वडील किर्लोस्कर मंडळीच्या मॅनेजरच्या ऑफिसांत आलेलीं वर्तमानपत्रें वाचीत बसले होते. त्यांच्या समोरून बालगंधर्व बाहिर्दिशेस जातांना त्यांनीं पाहिलें.

बालगंधर्वांच्या वडिलांनीं एक वर्तमानपत्र संपूर्ण वाचलें. त्याचप्रमाणें आणखी एकदोन वर्तमानपत्रेंही त्यांनीं संपूर्ण वाचलीं. नंतर मासिक पुस्तकांतील गोष्टी वाचावयाला आरंभ केला. हें सर्व वाचीत असतांना त्यांना जाणीव होती कीं, आपला मुलगा संडासांत गेला तो अद्याप परत आला नाहीं. म्हणून त्यांनीं सहज घड्याळ्याकडे पाहिलें तों त्यांच्या ध्यानांत आलें कीं, दहा वाजतां नारायण संडासांत गेलेला

आपण पाहिला; परंतु आतां बारा वाजले तरी, तो बाहेर आला नाहीं. या विचारानें वडील अगदीं गांधळून गेले. इतक्यांत जेवणाची घंटा झाली. घंटा ऐकतांच, सर्व मंडळी खालच्या मजल्यावरील भोजन हॉलमध्यें गेली. सर्व पदार्थ वाढून झाल्यावर 'पार्वतीपते हरहर महादेव' अशी गर्जनाही झाली. ती गर्जना ऐकतांच पुत्रवात्सल्यामुळें बालगंधर्वांच्या वडिलांच्या मनांत एकदम गोंधळ उडाला. त्या मनःस्थितींत ते एकदम जिना उतरून भोजन हॉलमध्यें खालीं गेले, व घाबऱ्या आवाजानें ओरडून म्हणाले, "अरे, तुम्ही सर्वजण जेवायला बसतां खरे; पण नारायण सुमारें दोन तास झाले संडासांत गेला आहे ही बातमी कोणाला कळली आहे का ?"

हे भाऊंचे ( नारायणरावांच्या वडिलांना 'भाऊ' म्हणत असत. ) शब्द ऐकतांच सर्व मंडळी घाबरून पानांवरून उठली व एकदम तिसऱ्या मजल्यावरील संडासाकडे धांवून गेली. भाऊही मंडळीच्या मागोमाग गेले व बाबऱ्या आवाजानें ओरडून म्हणाले, 'नारायण, नारायण, अरे आहेस का ? दोन तास झाले, तूं संडासांत गेलास, हें मीं पाहिलें; पण अजून बाहेर आला नाहींस म्हणून आम्ही सर्वजण घाबरून येथें आलों आहोत. तर आमच्या हाकेला नुस्ती ओ तरी दे रे', इतर मंडळींनीही घाबरून 'नारायणराव, नारायणराव' अशा हांका मारल्या. तेव्हां एकदम दार उघडून नारायणराव हंसत हंसत बाहेर आले आणि भाऊंना व सर्व मंडळींना म्हणाले, "अहो, तुम्ही सर्वजण घाबरून येथें गर्दी कशाला केलीत ?" नारायणरावांना पाहतांच वडिलांच्या जिवांत जीव आला व मायेच्या पण थोडया रागाच्या स्वरांत ते नारायणरावांना म्हणाले, 'अरे, आम्हांलाच उलट विचारतोस, कां घाबरलांत म्हणून ? दोन तासांपूर्वी तूं गडप झालास तरी आम्ही घाबरणें मूर्खपणाचें आहे काय ? मला असें वाटलें कीं, सकाळपासून तुला सारखे जुलाब होत आहेत. तेव्हां ग्लानीमुळें तूं संडासांत बेशुद्ध झालास कीं काय ?" भाऊंचे हे शब्द ऐकतांच नारायणराव पुन्हा मोठ्यानें हंसले. तेव्हां भाऊ फारच चिडले व म्हणाले, 'दोन तास तूं काय करीत होतास रे ?" तेव्हां बालगंधर्व हंसत हंसत म्हणाले, "अहो भाऊ, आज मीं प्रातःकाळींच फ्रूटसॉल्ट घेतलें होतें, म्हणून दोन, तीन वेळां जावें लागलें. दहा वाजतां हरि

नारायण आपट्यांची ही मनोरंजक कादंबरी घेऊन आंत गेलों व आतांपर्यंत दोन तास सारखें वाचीत होतों. पण तुमच्या व या सर्व मंडळींच्या गडबडीमुळें व घाबरण्यानें मला मधेंच बाहेर यावें लागलें." हे बालगंधर्वांचे शब्द ऐकतांच सर्व मंडळींत हंसूच हंसू लोटलें.

## ग्रामोफोनमध्यें पदें देण्याचा मान !

किर्लोस्कर मंडळींत येऊन बालगंधर्वांना सुमारें तीन वर्षें झालीं असतील. एवढ्याच अवधींत त्यांच्या मधुर गाण्याची कीर्ति किती पसरली हें पुढील गोष्टी-वरून सहज कळून येईल. मुंबई येथील सुप्रसिद्ध वकील श्री० गंगारामपंत रेळे यांचे येथें बालगंधर्वांचें खाजगी गाणें होतें. त्या प्रसंगीं ग्रामोफोन कंपनीचा एजंट मुद्दाम तेथें आला होता. त्या दिवशीं गाण्याला उत्तमच रंग चढला. एजंटानें बालगंधर्वांची कीर्ति आधींच ऐकली होती. त्या वेळचीं पदें ऐकून त्या आनंदाच्या भरांत त्यानें श्री० रेळे वकील यांचेजवळ कांहीं निवडक पदांचीं रेकॉर्डस् बाल-गंधर्वांनीं द्यावींत अशी इच्छा प्रगट केली व आपण यासंबंधीं शिफारस करावी असेंही सांगितलें. तेव्हां श्री० रेळे यांनीं लागलीच बालगंधर्वांच्या कानांवर ही गोष्ट घातली. बालगंधर्वांनींही "उद्यांक मालकांना विचारतों, त्यांची परवानगी मिळतांच मी रेकॉर्डमध्यें पदें देतों" असें कबूल केलें. दुसरे दिवशीं मालकांनीं परवानगी दिली व सौदा ठरला तो असा—

मला ( लेखकाला ) साधारणपणें आठवतें कीं, डझन पदांचीं रेकॉर्डस् द्याव-याचीं व त्याबद्दल अडीचशें रुपये मोबदला मिळावयाचा, असें ठरलें.

ठरलेल्या दिवशीं बालगंधर्व, हार्मोनियम मास्तर ( स्वतः लेखक ) व तबलजी आणि एजंट व एक बीन वाजविणारे गृहस्थ असे पांचजण आम्ही कोटामध्यें एका गल्लींत अगदीं शेवटच्या मजल्यावर पदांचीं रेकॉर्डस घ्यावयाची जागा मुक्रर केली होती, तेथें गेलों. मशीनच्या पुढें मध्यभागीं एका भोंग्या-पुढें बालगंधर्व गावयाला बसले. बाजूच्या दोन्ही भोंगाण्यापुढें हार्मोनियमची व तबल्याची योजना झाली. बरोबर आलेले एक ब्राह्मण बीनकार एका बाजूस बसले, मशीन चालू होतांच बालगंधर्वांनीं गावयाला सुरवात केली. क्रमाक्रमानें ठरल्याप्रमाणें बारा निवडक पदें बालगंधर्वांनीं म्हटलीं. यानंतर व्यवहाराच्या दृष्टीनें बालगंधर्वांनीं पदें देणें बंद करावयास पाहिजे होतें. तें त्यांच्या

लक्षांत राहिलें नाहीं. जवळच बसलेले बीन वाजवणारे गृहस्थ म्हणाले, 'अहो नारायणराव, तेवढें **बिहारी नयना मारोरे** म्हणा बुवा ! ' हें त्यांचें म्हणणें ऐकतांच नारायणरावांनीं तेंही पद रेकॉर्डमध्यें दिलें. एवढ्यावरच भागलें नाहीं तर '**नका टाकून जाउ डावा डोळा**' ही लावणी व '**धन्य जाहला माझा राम पहिला**' हें पद अशीं त्या बीन वाजवणाऱ्याच्या शिफारशीवरून जवळ जवळ आठ दहा पदें ठरलेल्या पदांपेक्षां रेकॉर्डमध्यें जास्त दिलेलीं मला आठवतात. त्या ( वेळीं हार्मोनियमची साथ करण्याकरितां प्रस्तुत लेखक पांडुरंग गणेश क्षीरसागर व तबल्याची साथ करण्याकरितां दादा लाड्डू वालावलकर हे होते. त्या वेळचे किर्लोस्कर मंडळीचे नाटकाचे वेळीं साथ करणारे आम्हीं दोघेजणच होतों. ( तेव्हां दादा एकदम ओरडून म्हणाले, 'अहो, नारायणराव, ही तुमची बैठक सुरू नाहीं ! अहो, बावीसबावीस पदें झालीं ना ! तुम्हीं हें काय चालविलें आहे ? ठरल्याप्रमाणें डझन पदें मघांच पुरीं झालीं ! ' दादांचे हे शब्द ऐकतांच बालगंधर्वांनीं गाणें बंद केलें.

वरील गोष्टीवरून बालगंधर्वांची दृष्टी पहिल्यापासूनच व्यापारी नव्हती हें सिद्ध होत आहे. ते आपल्या गाण्यांत तल्लीण होऊन रंगून जातात हेंच खरें !

रेकॉर्ड घेणाऱ्या कंपनीनें बालगंधर्वांनीं जास्ती पदें म्हटल्याबद्दल बिल देतांना २५० रुपयांपेक्षां कांहीं जास्त रक्कम दिली. त्याचप्रमाणें पेटी-तबला वाजवणाऱ्यांनाही कांहीं थोडे अधिक पैसे दिल्याचें मला आठवतें.

* * *

## बालगंधर्वांच्या पदांना नां-मोअर !

मानव जातीमध्यें विशेष चमत्काराची गोष्ट आढळून येते, ती ही कीं, प्रत्यक्ष डोळ्यापुढें दिसत असलेल्या ईश्वरनिर्मित वस्तुस्थितीचा चमत्कार वाटत नसून, चमत्कार जो वाटतो, तो त्याच्या उलट सामान्य अशाच कृतीचा. सूर्यापासून प्रत्येक दिवशीं अफाट अशा सर्व पृथ्वीवर प्रकाश पडतो व त्या प्रकाशानें अग्नीसारखी प्रखर उष्णता उत्पन्न होते. त्याचें

कुणी एकजणही कौतुक करतांना आढळून येत नाहीं. याचें उदाहरण, सूर्याचा प्रकाश पाहाण्याकरितां पृथ्वीवर जागजागीं गर्दी झालेली, कोणीच कधीं पाहिलां नसेल. परंतु सूर्याला ज्या दिवशीं खग्रास ग्रहण लागतें, त्या दिवशीं तें ग्रहण पाहाणाऱ्या हजारो किंवा लाखों माणसांना त्याचें आश्चर्य वाटल्याचें आढळून येतें. ग्रहणसुद्धा आकाशांत चमकणाऱ्या लक्षावधि ताऱ्यांना कधीं लागत नाहीं. तर तारापति अशा चंद्र-सूर्यांनाच लागतें.

बालगंधर्व म्हणजे रंगभूमीवरच्या गगनांतील तारापतीच आहेत, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. कारण पंचवीस वर्षांच्या त्यांच्या रंगभूमीच्या कर्तबगारीवरून व सेवेवरून महाराष्ट्रभाषा जाणणारे बहुसंख्याक किंबहुना सर्वच रसिक त्यांना 'नटसम्राट' या बहुमानानें संबोधीत असतात. बालगंधर्वांची सुभद्रेची भूमिका आज पंचवीस वर्षें प्रेक्षक पहात आहेत. पण नारायणराव रंगभूमीवर काम करूं लागल्यापासून सुमारें सात वर्षांनीं सुभद्रेच्या पदांना फजितीच्या टाळ्या व नो-मोअरची गर्दी झाली !

## असें तें नवल केव्हां घडलें !

ज्या सालामध्यें मुंबईच्या मुक्कामांत श्री० खाडिलकरांचें मानपमान नाटक प्रथम रंगभूमीवर आलें, त्याच वेळची मुंबईच्या मुक्कामांतली गोष्ट. नाताळच्या सुट्टींत एके दिवशीं रविवारीं दिवसां किर्लोस्कर मंडळीचें सौभद्र नाटक लागलें होतें. त्या दिवशीं बालगंधर्वांचा आवाज अजिबात बसला होता. तेव्हां बालगंधर्व सुभद्रेच्या वेषांत स्टेजवर येईतोंपर्यंत व पहिलें पद सुरू करीपर्यंत सौभद्र नाटक नेहमींप्रमाणें रंगलें होतें; पण बालगंधर्वांचें पहिलेंच पद बसक्या आवाजांत त्यांना नीट म्हणतां येईना—म्हणजे आवाज मुळींच चढेना. म्हणून त्यांनीं तें पद कसेंबसें साधें म्हणून टाकलें. त्याचप्रमाणें पहिल्या अंकांतील सुभद्रेचें दुसरें व तिसरें पदही साधेंच म्हटलें. अर्थात् सुभद्रेचें, पहिल्या अंकांतलें गाण्याचें काम संपलें. परंतु प्रेक्षक मात्र अगदीं नाराज झाले व चिडले. सहासात वर्षें बालगंधर्वांकडून मनोरंजन झालें याचा मोबदला म्हणूनच तीन पदें होईपर्यंत प्रेक्षक स्वस्थ बसले. पण दुसरा अंक

सुरू होतांच बसक्या आवाजांत बालगंधर्वांनीं पद कसेंबसें म्हटलेलें ऐकतांच प्रेक्षकांनीं, त्या दिवशीं एक विलक्षण उपक्रम सुरू केला तो असा—दुसऱ्या अंकापासून बालगंधर्वांचें बसक्या आवाजांतलें अगदीं साधें म्हटलेलें प्रत्येक पद मुकाट्यानें ऐकावयाचें व पद संपतांच बहुतेक सर्व प्रेक्षकांनीं वन्समोअर देऊन पुन्हा त्यांना तें पद म्हणावयाला लावावयाचें व बालगंधर्वांच्या पदांतील कांहीं शब्दांत त्यांचा आवाज बसकट व चिरकूं लागलेला ऐकतांच एकदम सर्वांनीं फजितीच्या टाळ्या द्यायला सुरवात करावयाची व उगीचच कल्ला करावयाचा. ‘ नो-मोअर ’ ‘ नो-मोअर ’ म्हणून मध्येंच पद बंद करण्याचा प्रयत्न करावयाचा !

हा प्रेक्षकांचा उपद्व्याप दुसऱ्या अंकांतल्या सुभद्रेच्या पहिल्या पदापासून पांचव्या अंकांतल्या शेवटच्या पदापर्यंत चालू होता. या वेळीं बालगंधर्वांच्या कर्तव्यांत एकच गोष्ट दिसून येत होती ती ही कीं, प्रेक्षकांनीं वन्समोअर दिला म्हणजे आपलें पद प्रथमपासून अखेरपर्यंत सरळ संपूर्ण इमानानें म्हणावयाचें. आपलें पद चालू असतांना प्रेक्षकांकडून होणाऱ्या फजितीच्या टाळ्या किंवा आरडाओरड व ‘ नो-मोअर, ’ ‘ नो-मोअर ’ हें जसें कांहीं त्यांच्या ध्यानींमनींच नव्हतें.

वरील गोष्टीवरून त्या वेळचे प्रेक्षक किती कडक शिस्तीचे होते, हें दिसून येईल. याचप्रमाणें रंगभूमीच्या नभोमंडळांत आपल्या प्रखर तेजानें प्रेक्षकांना सदोदित दिपवून टाकणारा प्रखर सूर्य एक दिवस तरी ग्रासित रवीप्रमाणें निस्तेज झाला हें खरें.

‘ परमेश्वर जें कांहीं करतो तें बऱ्याकरतां ’ ही म्हण अक्षरशः खरी आहे. त्या दिवशींच्या फजितीच्या टाळ्यांनीं बालगंधर्वांना एक चांगलाच इशारा मिळाला. तो हा कीं, रंगभूमीवर सतत सूर्याप्रमाणें आपलें तेज कायम ठेवावयाचें असेल तर प्रकृति निकोप ठेवा ! त्याच एका खडखडीत इशाऱ्यामुळें रंगभूमीच्या या कट्ट्या भक्तानें आज सतत पंचवीस वर्षें आपलें शील उत्तम ठेवून शरीर निकोप ठेवलें; हेंच खरें !

# प्रेक्षकांचा 'वॉक्-औट.'

एकटे बालगंधर्व रंगभूमिवर काम करतांना दिसले म्हणजे कोणा प्रेक्षकाची कांहीं तक्रार नसते. अगदीं शेवटच्या दर्जाचें तिकीट काढणारे प्रेक्षकही म्हणतात कीं, 'आज, आपले आठ आणे वसूल झाले !' पण सन १९०७ अगर १९०८ सालीं घडलेली गोष्ट अशी आहे कीं, मुंबई येथें किर्लोस्कर मंडळीचा मुक्काम नेहमींप्रमाणें मोठ्या थाटानें सुरू होता. त्याच वेळेस स्वदेश हितचिंतक मंडळीही नटांचा उत्तम संच, द्रव्य व कीर्ति या बाबतींत किर्लोस्कर मंडळीशीं जणुं स्पर्धा करीत होती. . त्या मंडळीचे मुख्य प्रमुख नट म्हणजे नटवर्य गोरे, केशवराव भोसले, दत्तोपंत भोसले, विष्णुपंत पागनीस, हे असून बाकीच्या नटांचा भरणाही चांगला होता. मुंबईस बॉम्बे थिएटरांत किर्लोस्कर मंडळीचे खेळ चालू होतें, व समोरच्या एल्फिन्स्टन थिएटरांत 'स्वदेश हितचिंतक मंडळी' चे खेळ चालू होते. दोन्हीही कंपन्यांबद्दलची प्रेक्षकांची सहानुभूति चांगली होती. पण किर्लोस्कर मंडळीचें वैशिष्ट्य होतें तें हें कीं, त्यांच्या पीटच्या जागेचा दर आठ आणे होता. व बाकीच्या प्रमुख संगीत व प्रोज कंपन्यांचा पीटचा दर चार आणे होता. ( त्या वेळीं नांवाजलेल्या इतर कंपन्या म्हणजे स्व. ना. मं. नाट्यकला प्रवर्तक संगीत मंडळी, गद्यश्रेष्ठ शाहूनगरवासी नाटक मंडळी व महाराष्ट्र नाटक मंडळी ) अशा स्पर्धेमध्यें खेळ चालू असतां सौभद्र नाटकाचे दिवशीं सकाळपासून कै० जोगळेकर यांचा आवाज एकाएकीं बसला. वैद्यकीय वगैरे उपाय खेळ सुरू होईपर्यंत सर्व केले; पण त्यांच्या तोंडांतून एक 'ब्र' सुद्धां निघेना. म्हणून त्या वेळीं कांहीं कांहीं नाटकांत दुय्यम दर्जाचें काम करणारे नट कै० दडपे यांना अर्जुनाची भूमिका करण्यास सांगितली. दडपे हे अंगापिंडानें व दिसायला जवळ जवळ जोगळेकरांसारखेच होते. त्यांचा आवाज बाळकोबा नाटेकराप्रमाणें अत्यंत गोड होता. त्यांची वाणी नटवर्य गोऱ्यांच्याप्रमाणें अस्खलित व स्वच्छ होती. परंतु पदें मात्र ते अगदीं साधीं म्हणत असत. त्या दिवशींच्या सौभद्राला नेहमींप्रमाणें उच्च दर्जाच्या व सुशिक्षित प्रेक्षकांनीं थिएटर चिकार भरून गेलें होतें. सौभद्र नाटकाची नांदी सुरू होऊन पहिला प्रवेश आटोपला व अर्जुन रंगभूमिवर आला. परंतु ते दडपेच आहेत, जोगळेकर नाहींत.

अशी खात्री होतांच, प्रेक्षक नाराज होऊन त्यांनी एकदम काठ्या आपटायला व टाळ्या वाजवायला सुरुवात केली. तरी, पण धिटाईनें दडपे यांनीं आपलें काम सुरूच ठेवलें होतें. तेव्हां प्रेक्षक अतिशय चिडून गेले व मोठमोठ्यानें शिट्या वाजवून, टाळ्या वाजवून व काठ्या आपटून असें दर्शवीत होते कीं, रा० दडप्यांनीं आंत जावें, व जोगळेकरांनींच अर्जुनाच्या भूमिकेंत बाहेर यावें. पण ही गोष्ट अशक्य असल्यामुळें तसेंच नाटक सुरू होतें. रा० मुजुमदारांचा असा अंदाज होता. कीं, कांहीं वेळ लोक गडबड करतील व आपोआप गप्प बसतील. नंतर बोडस नारदाची भूमिका घेऊन रंगभूमीवर आले. बोडसांच्या नारद व कृष्ण या भूमिका त्या वेळीं नुकत्याच लोकप्रिय झाल्या होत्या. तेव्हां बोडस स्टेजवर दिसले, म्हणजे गडबड बंद होईल असें मुजुमदारांना वाटलें, पण छेः ! बोडस स्टेजवर आले तेव्हां, प्रेक्षकांना असें वाटलें कीं, ' मॅनेजर आपल्याशीं दंडेली करताहेत. आमचें काय म्हणणें आहे, हा प्रश्न ते आम्हांस कां करीत नाहींत ? ' असा विचार सर्व प्रेक्षकांच्या मनांत येऊन त्यांनीं दिढी-दुपटीनें कल्ला करावयास सुरुवात केली. प्रेक्षक ऐकत नाहींत असें पाहून मुजुमदार स्टेजवर एकदम येऊन उभे राहिले व जोगळेकरांच्या संबंधानें त्यांनीं वस्तुस्थिति निवेदन केली. त्या वेळीं प्रेक्षकांपैकीं एक सभ्य गृहस्थ बोलावयास उठले व म्हणाले, ' आम्ही तुमच्या कंपनीचीं नाटकें दुप्पट दर देऊन कां पाहातों ? याचें कारण तुमचीं सर्व पात्रें जेथल्या तेथें असून प्रमुख पात्रें तर अद्वितीय आहेत. तर त्यांपैकीं जोगळेकर आज अर्जुन होणार नसतील तर, आम्ही आपली गडबड अशीच सुरू ठेवूं ! ' तेव्हां मुजुमदारांनीं प्रेक्षकांना प्रश्न केला कीं, कोणत्या अटीवर आजचें नाटक स्वस्थपणें पहाल ? ' तेव्हां प्रेक्षकांतर्फे बोलणारे सद्गृहस्थ म्हणाले, ' आमची अट ही कीं, आजचीं आम्ही घेतलेलीं तिकिटें अशींच परत नेऊं आणि पुढील सौभद्र नाटकांत जोगळेकर यांनीं अर्जुनाची भूमिका घ्यावी व त्या खेळास हींच तिकिटें चालावींत. हें जर कबूल करीत असाल तर, आम्ही आजचें नाटक स्वस्थपणें पाहतों.

तेव्हां रा० मुजुमदार म्हणाले, ' ही अट कबूल करणें म्हणजे आमच्या कंपनीचा उघड उघड निम्मा दर कबूल करणें आहे. किंवा आजचें सौभद्र

लोकांच्या कलकलाटाला भिऊन फुकट दाखवण्यासारखेंच आहे. तर रा० जोगळेकर आज अर्जुन होणें अशक्य आहे. तेव्हां ज्यांची तिकिटाचे पैसे परत घेऊन जाण्याची इच्छा असेल त्यांनीं तसें करावें. तेव्हां एकदम पांच सहाशे प्रेक्षक थिएटरमधून उठले, व आपापले पैसे घेऊन निघून गेले.

वास्तविक त्या वेळीं गंधर्वांची सुभद्रेची भूमिका सर्वोत्कृष्ट अशी होत होती. त्याचप्रमाणें नटवर्य बोडस आदिकरून इतर संचही उत्तम असून एकटे जोगळेकर अर्जुन नाहींत म्हणून, पांचसहाशें प्रेक्षक आपले पैसे परत घेऊन गेले! तेव्हां असा अंदाज करावयास हरकत नाहीं कीं, त्या वेळचे प्रेक्षक सर्वोत्कृष्ट नट रंगभूमीवर असले तरच खूष असत. एकंदरींत त्या वेळस बालगंधर्वांची रंगभूमीच्या सेवेची तपश्चर्या पूर्ण फळास आली नव्हती हेंच खरें!

## मीसुद्धां थर्डक्लासमध्येंच बसेन!

कै० अण्णासाहेब किर्लोस्करांचे वेळेपासून किर्लोस्कर मंडळींतील सर्वांना ( लहानपणापासून थोरापर्यंत ) संस्थानी थाटाचें जेवण वगैरे मिळत असे. त्याचप्रमाणें प्रवासाचे वेळीं, मालकापासून गड्यापर्यंत सर्वजणांनीं कंपनी परगांवीं चालली म्हणजे सेकंडक्लासमधून प्रवास करण्याचा पद्धत होती. किर्लोस्कर थिएटर उभारल्यानंतर स्वयंपाकखात्यांतील लोक व गडीखात्यांतील लोक रिझर्व केलेल्या थर्ड क्लासांत बसवावयाचे असें चालकांनीं ठरविलें. कारण किर्लोस्कर थिएटर उभारण्याकरितां किर्लोस्कर मंडळीस बरेंच कर्ज झालें होतें. याच कर्जा सबबीखालीं एके दिवशीं हुबळीहून कंपनीचा मुक्काम मिरजेस जात असतांना, बालगंधर्व, बोडस, जोगळेकर इत्यादि प्रमुख नटांची सहा सात सेकंडक्लासचीं तिकीटं काढलीं. बाकी सर्व जणांचीं थर्डक्लासचीं तिकिटें काढलीं. तेव्हां हुबळीच्या स्टेशनवर हा प्रश्न विचारण्यांत अर्थ नाही म्हणून, थर्डक्लासमध्यें बसवलेली मंडळी स्वस्थ राहिली. मिरजेस किर्लोस्कर मंडळी पोंचल्याबरोबर सर्व मंडळींनीं संप केला व किर्लोस्कर मंडळीचे मॅनेजर व मालक यांच्यापुढें सादर करण्याकरतां एक अर्ज लिहून तयार केला. हीं गडबड बालगंधर्व यांच्या कानावर जातांच ते संपवाल्या मंडळीच्या बैठकींत येऊन दाखल झाले व म्हणाले

"तुमची ही तक्रार अगदीं योग्य आहे. तुमचा हा अपमान जितका तुमच्या मनाला लागून राहिला आहे, तितकेंच दुःख मी जरी सेकंडक्लासमध्यें बसून आलों तरी, मला झालें आहे. आजपर्यंत तुम्ही सतत सेकंडक्लासमधून प्रवास करीत आलां आहांत, व एकाएकीं हा अपमानकारक प्रकार पाहून तुमच्या मनाला कशा प्रकारची तळमळ लागली असेल, याची कल्पना माझ्या मनांत येऊन मला फार वाईट वाटलें. तेव्हां या पुढील प्रवासांत मागील परिपाठाप्रमाणें जर तुम्हां सर्वांना सेकंडक्लासमध्यें बसविलें तरच मी सेकंड-क्लासमध्यें बसेन; नाहींतर तुम्हां सर्वांबरोबर मीही थर्डक्लासमधूनच प्रवास करीन."

बालगंधर्व मंडळींना अनुकूल होते म्हणून किंवा जोगळेकर (मालक) न्यायी व सहृदय होते म्हणून म्हणा, त्या तक्रारीचा निकाल मंडळींच्या मना-सारखा म्हणजे पुढील प्रवास सर्वांनीं सेकंडक्लासमधून करावयाचा अशा अर्थाचा झाला.

दुसरी गोष्ट रा० जोगळेकर व रा० मुजुमदार यांनीं संपाचा सूड कोणत्याही प्रकारें उगवला नाहीं. अर्जाचा निकाल होतांच पूर्वीप्रमाणें सर्व मंडळींशीं ते प्रेमानें वागूं लागले.

बालगंधर्वांचें मन त्या वेळींच इतकें मोठें होतें असें नाहीं. पुढें थिएटरचें कर्ज पुष्कळ झालें तरी किर्लोस्कर मंडळीनें आपला संस्थानी थाट चालू ठेवावा असेंच त्या वेळीं त्यांचें मत होतें. तसेंच त्यांनीं आपल्या स्वतःच्या मालकीच्या गंधर्व नाटक मंडळीला झालेलें तीन लाखांचे वर रकमेचें कर्ज फेडीत असतांनासुद्धां कंपनीचा संस्थानी थाट अगर खर्च यत्किंचितही कमी केला नाहीं.

वीस वर्षें लोकादरास पात्र झालेलें

**विश्रांतिगृह—** आमचेकडे सर्व प्रकारचे फराळाचे जिन्नस ताजे व रुचकर मिळतात.

**जोगळेकर विश्रांतिगृह,**

किर्लोस्कर थिएटर, पुणें नं. २.

## पहिल्या अपत्याचा मृत्यु--समतोल मनःस्थिति.

सर्वसामान्य मनुष्यापेक्षां असामान्य असे गुण ज्या मनुष्याच्या अंगीं दिसून येतात, अशा व्यक्तींना विभूति म्हणून बहुमानानें जग संबोधित असतें. असे अलौकिक गुण क्वचित प्रसंगीं तशाच अकल्पित प्रसंगामुळें कांहीं विभूतींच्या चरित्रांत आढळून येतात. अलीकडील महासाधु गाडगे महाराज यांच्यासंबंधानें व लोकमान्य टिळकासंबंधानें अशा कांहीं आख्यायिका ऐकण्यांत आहेत.

(१) एकदां महासाधु गाडगेमहाराज यांचें कीर्तन चालू असतांना त्यांचा मुलगा निवर्तल्याची बातमी त्यांना कोणी येऊन सांगितली; पण गाडगेमहारांनीं आपलें कीर्तन तसेंच चालू ठेविलें, व श्रोतुसमुदाय नेहमीं प्रमाणें हंसवून व भक्तिभावांत तल्लीन करून सोडला. कीर्तन संपतांच ते परत गेले तेव्हां कुठें सर्व श्रोतृसमुदायाला ती बातमी कळली. अर्थात् नेहमीप्रमाणें कीर्तन रंगल्याबद्दल आश्चर्यचकित होऊन लोक गाडगे महाराजांचें कौतुक करूं लागले.

(२) त्याचप्रमाणें लोकमान्य टिळक यांचा थोरला मुलगा विश्वनाथ पुण्याच्या ऐन प्लेगाच्या कहरामध्यें ऐन तारुण्यांत मृत्यूच्या जबड्यांत सांपडला. त्याच दिवशीं लोकमान्यांनीं आपल्या केसरीचा अग्रलेख नेहमींप्रमाणें जोरदार लिहिला.

वरील दोन विभूतींच्या आख्यायिका जनसमूहाला कौतुकास्पद वाटणें योग्य आहे. त्याचप्रमाणें बालगंधर्व यांचें पहिलेंच अपत्य-पाहिली कन्या-सुमारें एक वर्षाची होऊन आजारी पडून ज्या दिवशीं प्रातःकाळीं क्रूर काळानें आपल्या घशांत टाकली, त्याच दिवशीं दुपारीं किर्लोस्कर मंडळीचा मुंबई मुक्कामीं "मानापमान" नाटकाचा प्रथम प्रयोग सुमुहूर्तानें रविवारीं दिवसां व्हावयाचा होता. (सदर प्रसंगीं मी स्वतः त्या वेळीं किर्लोस्कर मंडळीचा नोकर होतो. म्हणूनच प्रत्यक्ष पाहिला.) तेव्हां आजचा प्रथमच होणारा "मानापमाना" चा प्रयोग बंद ठेवावा असें श्री० खाडिलकर, श्री० जोगळेकर, श्री० मुजुमदार वगैरे प्रमुख मंडळींनीं ठरविलें. कारण बालगंधर्व आज दुःखातिवेगानें विव्हळ झालेले आहेत. त्याप्रमाणें या प्रमुख मंडळींनीं बालगंधर्वांना कळविलें, परंतु बालगंधर्व यांनीं तें कबूल केलें नाहीं.



कै० बाळकोबा नाटेकर.



कै० राम गणेश गडकरी, कविवर्य व नाटककार.



कै० काशीनाथपंत परचुरे.



श्रीयुत गणपतराव बोडस.

" तुम्ही आजचा प्रयोग बेलाशक करावा माझें काम मी मनोभावानें उत्कृष्ठ करीन याबद्दल बिलकूल काळजी करूं नये. " असें त्यांनीं सांगितलें तेव्हां त्यांचें मनोधैर्य पाहून त्या दिवशींचा मानापमानाचा (१९११) आद्य प्रयोग नक्की करण्याचे ठरवून त्याप्रमाणें प्रयोग झाला. त्या दिवशीं मानापमान नाटक फारच उत्तम रंगले. त्यातले त्यांत बालगंधर्वांची भामिनीची भूमिका जितकी उत्तम व्हावयास हवी होती तितकी उत्कृष्ट झाली. बहुतेक सर्व पदांना तनितनि वारंवार वेळां वन्स मोअर्स झाल्या. व विशेष दुसऱ्या अंकातील भामिनीचे शृंगारीक भाषण "ते कां ? ते पाहताहेत म्हणून मी पहाते!" व त्याचप्रमाणें चौथ्या अंकांतील भामिनीचे शृंगार रसाचा सर्व प्रवेश पाहून मूर्तिमंत शृंगार देवताच रंगभूमीवर जणूं काय अवतीर्ण जाहली आहे कीं काय असे प्रेक्षकवृंदास क्षण-मात्र वाटले. सारांश त्या दिवशीं आपलें मन दुःखाग्निनें होरपळत असतां आवरून धरून तितकीच उत्तम स्वतःची भूमिका रंगविल्याबद्दल त्याची कन्या वारली आहे हे ज्यांना ठाऊक होते, त्यांना व त्यानंतर प्रेक्षकांस ही बातमी समजताच सर्वांनांच सखेदाश्चर्य वाटले व त्याबद्दल बालगंधर्वांचे कौतुक करावे तितके थोडेच आहे असे उद्गार सर्वतोमुखीं जाहले.

पण त्या दिवशीं भामिनीचें काम बालगंधर्वांनीं कां केलें ? वरील प्रश्न विचार करण्यासारखाच आहे. वास्तविक त्यावेळीं बालगंधर्व १५० रुपये पगार घेणारे किर्लोस्कर मंडळीचे नोकर होते. त्या दिवशीं मानापमानाचा प्रथम प्रयोग बंद ठेवला असतां तर त्या दिवसाचे हजार पंधराशेंचे उत्पन्न प्रेक्षकांस रिफंड करावे लागले असते. किर्लोस्कर मंडळीचे चालकाचे पेटींत सदर रक्कम पडली नसती. व्यवहारदृष्ट्या बालगंधर्वांचे पैचेही नुकसान जाहले नसते. तर मग बालगंधर्वांनीं भामिनीची भूमिका कां केली? तर त्यांचें कारण हेंच असलें पाहिजे कीं बालगंधर्वांच्या प्रेमळ व उदार अंतःकरणाला असे वाटले कीं, आजचा मानापमान जर बंद जाहला तर श्री. खाडीलकर यांचे मनाला एक प्रकारचा विलक्षण धक्का बसेल. कारण त्यांनीं यापूर्वी गद्यनाटकें लिहून अभिनयकुशल अशा प्रख्यांत महाराष्ट्र नाटकमंडळीकडून यशस्वीरीतीनें रंगभूमीवर आणिले. परंतु संगीत मानापमान श्री. खाडीलकर यांची नाट्यकलेंतील संगीत आद्य नाट्यकृति प्रथमच सुमूहूर्तावर रंगभूमीवर येणार.

खाडीलकर यांनीं आपल्या नाट्यकृतीस नवीनच संगिताचे वळण लाविले आणि प्रथम कृतीस प्रथम प्रयोगास अशा सुमूहूर्तावर आणि नाटयमन्वंतरांत क्रांती घडवून आणणाऱ्या पद्यांच्या नवीन चाली प्रख्यात हर्मोनियम प्लेअर श्री. टेंबे यांचेकडून मुद्दाम बहुश्रमानें निवडक, व अत्यंत मधुर अशा उपलब्ध केल्या. या सर्व गोष्टीमुळें पहिला मानापमान बंद पडल्यानें श्री. खाडीलकरांचा विरस होईल. त्यांनीं रंगभूमीची केलेली अमुल्य सेवा व्यर्थ जाईल. त्यांचा उत्साह भंग होऊन पुढील कृतीं कार्यक्षम होणार नाहीत. आपल्या मंडळींच्या चालकास प्रेक्षकांचा विरस करवून पेटींत साचलेली हजार दीडहजारांची गंगा-जळीं केवळ आपल्या एकट्याचकरितां परत करावी लागेल. किर्लोस्कर मंड-ळीच्या लौकिकांस जागरूक होऊन उत्साहानें नाटयगृहांत प्रवेश केलेल्या व आपल्या जागीं उपस्थित होणाऱ्या हजारों प्रेक्षकांस मनोभग पावून परत स्वगृहीं खिन्न रितीनें जाऊन निद्रादेवीची आराधना करावी लागेल ह्या विचारामध्यें बालगंधर्वांचे मन एकवटून गेलें. आणि दुःखातिशयानें होरपळ-णारे अंतःकरणावर विचारांची गर्दी उडून त्या दुःखाचे तात्कालिक सांत्वन जाहले व त्या दिवसाचे नाटयकृतींत नेहमींपेक्षां अलौकिक असें काम करून प्रेक्षक, लेखक व चालक ह्यांचे समाधान केले. त्याबद्दल त्यांना द्यावेत तेवढे धन्यवाद थोडेच आहेत. त्याविषयीं दुसरें एक उदाहरण ह्याचे उलट १९३० मध्यें बालगंधर्वांचे हातून घडले ते असे.

## बालगंधर्वांनीं गंधर्व मंडळीचा आपला द्रौपदी खेळ बंद ठेवला आणि प्रेक्षकांस तिकिटाचे पैसे परत केले

१९३० सालीं गंधर्व नाटक मंडळीचा मुक्काम पुणें येथें होता. एके शनिवारी त्यांनीं द्रौपदी नाटक लाविले होते. खेळ सुरू होण्याची वेळ आली होती. हजार पंधराशेची तिकिटे खपली होती; इतक्यांत बालगंधर्वांचे घरून बातमी आली कीं "आपले कुटुंबाचे पोट फार दुखत आहे" या वेळीं कुटुंब गरोदर असून दिवस भरत आले होते. घरीं योग्य अशी व्यवस्था होती मातोश्री वगैरे आप्त स्वगृहीच होते. डॉक्टर, नर्स, सुईण वगैरे हजर होत्या, तरी कुटुंब घाबरले आहे हे कळतांच आपण स्वतः जाण्यास सिद्ध

होऊन खेळ बंद केला व तिकिट विक्रीचे पैसे परत करण्याबद्दल फर्मान दिले व सुमारे १५०० दीडहजार रुपये प्रेक्षकांस परत केले.

या दुसऱ्या गोष्टीवरून बालगंधर्वास पैशाची पर्वा नव्हती हे सिद्ध होते. पण किर्लोस्कर मंडळीचा सुमुहूर्तानें होणारा मानापमानाचा प्रथम प्रयोग बंद ठेविला असतां तर आपल्या कीर्तीस कलंक लागला असतां असे खास त्यांस १९११ सालीं वाटलें असावे हे उघड आहे.

---

## हळदी कुंकू.

मनुष्यास थक्क करून सोडणाऱ्या गोष्टी पुराणांत किंवा इतिहासांपेक्षां गप्पीदासाचे गप्पाष्टकांत पुष्कळच ऐकूं येतात. कल्पना चतुरांच्या सुपीक मेंदूतून निघालेल्या कल्पित गोष्टी जगांला अधिक थक्क करून सोडतात. श्रीकृष्णानें मातेला स्वमुखांत विश्वदर्शन दिले. अर्जुन कर्तव्यच्युत होत असतां विश्वरूप दाखवून कर्तव्य दक्ष केले ह्या गोष्टी पुराणांतील जाहल्या. परंतु राधेजवळ एकांतीं असतां राधेचा भ्रतार येतांच श्रीकृष्णानें तात्काळ बाळरूप धारण केलें. ही गोष्ट त्यावेळच्या कोणातरी गप्पीदासाच्या सुपिक मेंदूतील असावी असे वाटते. तो अवतार संपून ५००० हजार वर्षे लोटली. हल्ली द्वापार युगांचा अंत होऊन कलि युगाचा प्रारंभ जाहला. घरोघर शहाणे, घरोघर सुपीक मेंदू, त्याचप्रमाणें दुसरे बाजूस घरोघरीं गप्पीदासाचे अड्डे, हवेंत उडणाऱ्या लाटांना कल्पना शक्तीचे स्वरूप देऊन नाहक खोट्या गोष्टींना थारा मिळतो तर आमच्या नटसम्राट बालगंधर्वांना त्याना आपले आटोक्यांत कां आणतां येणार नाहीं! व तेही त्यांचे तावडीतून कैसें सुटणार?

बालगंधर्वासंबंधानें अशाच प्रकारच्या अजब गोष्टी कांहीं दिवसांपूर्वी लोकांत पसरल्या होत्या. त्या अशा " अहो, ते स्त्रीवेश घेऊन बायकांत बसावयास गेले तर ओळखूं सुद्धां येत नाहींत. तें खरोखर स्त्री आहेत असे वाटून बायका फसतात.

एकदां वसंत ऋतूंत हळदी कुंकूवाचे समारंभांत आपण स्त्रीवेश घेऊन जाणार असे आपल्या घरांतील काकूंना बालगंधर्वांनी कळविलें व त्या समवेत अमक्या अमक्या रावबहादूरांचें घरीं आले होतें, बायकांना हळदी कुंकू दिले. ओटी भरली. इकडील तिकडील गोष्टी सांगितल्या आणि निघून आले आणि मागावून कांकूंनीं गुप्त गोष्टी फोडिल्या आणि मग बायकांचा दोन घटका एकच हंशा जाहला. कै. भाऊराव कोल्हटकर यांचें संबंधानें देखील अशाच कंड्या महाराष्ट्रांत पसरल्या होत्या. परंतु नटसम्राट म्हणून प्रसिद्ध पावणाऱ्या हिंद नाट्यकृतीमध्यें अग्रेसरत्व मिळविणाऱ्या गुणग्राहक अशा व्यक्तीकडून असल्या प्रकारचे साहस होणें शक्य नाहीं. या सर्व गोष्टी कल्पकांच्या कल्पना सृष्टितील होत.

---

## भयंकर आख्यायिका.

आधुनिक कालांत नाट्यसृष्टिचा रागरंग अशा अर्थाची स्फुटे लिहून नाटक मंडळ्या कोठे आहेत कोणते खेळ करितात त्याची नाटयकला मीमांसा करून सांपत्तिक स्थिति जनतेला जशी वर्तविली जाते तशीं कांहीं वर्षांपूर्वी स्थिति नव्हती, किंवा नाटक मंडळ्या दूर पल्ल्यावरच्या मुक्कामाव- असतांना आपले अस्तित्व दर्शविण्याकरितां हल्लीं प्रमाणें दैनिकातुन किंवा साप्ताहिकातून आपल्या नाट्यप्रयोगाच्या जाहिराती देत नसत. सन १९१०--११ सालीं किर्लोस्कर मंडळीचा मुक्काम असाच दूर पल्ल्यावर असतांना मुंबईत अशी वदंता उठली कीं "बालगंधर्व एक सुंदर तरु- णीला पळवून कोठे बेपत्ता झाले परंतु तिचे आप्तेष्टानें त्यांना पकडून नुकतेच मुंबईस आणले आहे." पण वर्तमान निवेदकांस हकिगतबद्दल खुलासा विचारतांच ते म्हणतात कीं बालगंधर्व आमच्या परिचयाचे नाहींत किंवा आम्ही ह्या कृतींत त्यांना प्रत्यक्ष पाहिलें नाहींत. यावरून राधे- जवळ कृष्ण असतांना राधापती देखतांच बालवेशी होतो आणि राधापती विन्मुख होताच तारुण्य धारण करतो अशा दंतकथे पैकींच ही एक होय नाट्यकला विशारद बालगंधर्व यांचे हातून अशा प्रकारची नीच कृती

होईल अशी कल्पना निदान सुशिक्षित, विचारी, सुहृदयी माणसाच्या अंतरंगास बिलकूल शिवणार नाहीं. बालगंधर्वांचे घराणें कुलीन. त्यांची राहणी अत्यंत सभ्य, वागणूक अत्यंत साधी, त्यांचें अंतःकरण शुद्ध असा आतांपर्यंतचा अनुभव आला असून त्यांचा धर्माबद्दल किती आदर आहे हे जनतेला केलेल्या मदती वरून स्पष्ट दिसून येतें. तेव्हां असला निंद्य प्रकार त्यांचे हातून घडणें अगदीच दुरापास्त आहे. आधुनिक नाटककार कै. कोल्हटकर आपल्या गुप्तमंजूष नाटकांत विलासाच्या तोंडी एक वाक्य वदवितात ते असें.

विलास: —वंचका, तुझ्या पोटीं तूं इतक्या खोट्या गोष्टी सांठविल्या आहेस कीं कालांतरानें त्या तुझ्या तुलाच खऱ्या वाटतील N. P. वरील काव्योक्ति प्रमाणें जनतेच्या पोटांत साठलेल्या खोट्या गोष्टी फार दिवस राहिल्यानें खऱ्या आहेतच असा भास होणार आणि निष्कारण नाट्यकला चतुर अशा थोर विभुतिला जनलीलेनें कलंक लागणार हे खरोखरच अप्रस्तुत होय.

---

## मालकीचें जूं कां झुगारलें ?

किर्लोस्कर मंडळीनीं मानापमान नाटक रंगभूमीवर आणल्यानंतर मंडळीचे मालक. जोगळेकर हे एकाएकी १९११ ते १२ विषमज्वरानें मृत्युमुखीं पडले. तेव्हां मंडळीचे जिवलग मित्र व हितचिंतक श्री. गोपाळराव सुळे वगैरे एकत्र जमून कंपनीच्या भावी घटनेबद्दल विचार विनिमय करूं लागले. कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं घालून दिलेल्या परंपरेला अनुरुप मंडळीतील प्रमुख व तडफदार अशा माणसास मालक केले. (जोगळेकरांचे तोडीचे किंजवडेकर यांना मालकी हक्काबद्दल कांहीं रक्कम देऊन ऋणमुक्त केले व जोगळेकराचे कुटुंबांस वारस हक्काबद्दल मासिक वेतन ठरविले ) त्यावेळीं शंकरराव मुजूमदार, बालगंधर्व व बोडस या त्रयींना सुळे वगैरे मंडळींनींच भागीदार केले असें एकिवात आहे. ही गोष्ट मिरज मुक्कामीं घडली. या भागीदारीबद्दल कायदेशीर दस्त करण्याचे ठरले; परंतु संस्थानी राजवटींत भागीपत्र रजिस्टर्ड करण्यापेक्षां ब्रिटीश हद्दींत करणें बरे असें वाटल्यावरून

ठरावाचा कच्चा कागद होताच कंपनीचे खेळ सुरूं जाहले. पहिला खेळ सौभद्र तेथेच जाहला. अर्जुनाची भूमिका रा. ब. ल. पेठे यांचेकडे होती. जोगळेकराचे बदली नानबा लेले हे जे गृहस्थ आले होते, त्यांना नायकाची भूमिका कोणतीच पाठ नव्हती. बालगंधर्व, बोडस व सुळे यांचे सूचनेवरून एक दोन महिन्यांत जोगळेकरांचे जागीं श्री. टेंबे यांना दरमहा १५० रुपये पगारावर मंडळींनीं ठेवले होते. मिरजेहून सांगली निपाणी, बेळगांव व कोल्हापूर इत्यादि ठिकाणीं मंडळी क्रमाक्रमानें मुक्काम घेत गेली. वरील तीन चार ठिकाणांत कंपनीचा कागद कोठेच रजिस्टर झाला नाहीं, कारण शंकरराव मुजूमदार व बालगंधर्व आणि बोडस या द्वयीमध्यें कांहीं विलक्षण व अपरिहार्य मतभेद जाहला. त्याची चर्चा करण्याचे हे स्थल नव्हे व त्याचे चर्वित चर्वण करण्याचे प्रयोजन दिसत नाहीं. पण बालगंधर्व नोकराचे मालक जाहले. मालकाचे पुनः नोकर जाहलें. या प्रकाराबद्दल पुष्कळांना एक प्रकारची मौजच वाटली.

श्रीयुत बालगंधर्व हे किर्लोस्कर मंडळीत मुजूमदारांना भीत असत व मानीत असत. हे त्यांना भूषणास्पद आहे. नोकरीवर असतांना विनयशील वर्तनांत राहून मुजूमदार अगर जोगळेकर यांचे डोळ्यास डोळा कधीं त्यांनीं लावला नाहीं. किंवा प्रत्युत्तर कधीं दिले नाहीं. वडील माणसाबरोबर भागीदारी पतकरून समभागी होणें श्रेयस्कर नाहीं असे बालगंधर्वाचें मत होतें. भागीदारी पतकरल्यावर मंडळीची व्यवस्था ठेवतांना हे असें कां! ते तसें कां! हे वेळोवेळीं विचारावे लागेल! नावडती गोष्ट करूं नका असे अधिकारवाणीनें बजावयास लागेल! ही गोष्ट करतांना आपला पूर्वनैतिक संबंध भ्रष्ट होईल ह्यामुळेंच त्यांनीं टाळले अशी दंतकथा आहे.

## अंगरखा व पगडीचे पोषाखांत

किर्लोस्कर मंडळीचे मालक एकटेच मुजुमदार झाले.

कोल्हापूरचा मुक्काम सोडून मंडळी सातारा मुक्कामीं आली. मुजुमदाराच्या स्वतःचे मालकीची मंडळी असतांना हा पहिलाच मुक्काम होय. पैशाच्या व कीर्तीच्या दृष्टीनें तो यशस्वी रीतीनें पार पडला.

किर्लोस्कर मंडळी संस्था या दृष्टीनें बळकट व्हावी म्हणून नवीन योजना आखून संस्थेच्या नोटीसबोर्डावर तालीम हॉलमध्यें नोटीस लावून जाहीर केले त्यांतील आशय.

" बालगंधर्व आणि बोडस यांस सर्वच नाटकाच्या भूमिका कराव्या लागतात ह्यामुळें फार श्रम होतात. तरी त्यांनीं विनायकराव बेहेरे ( सदर नांवाचा एक १५-१६ वर्षाचा मुलगा कंपनींत आला होता व तो गंधर्वांच्या पदाची योग्य नक्कल करीत असे ) व बाबुराव गाडे यांना एकदोन नाटकांत आपआपले कांहीं चान्स देऊन आपले श्रम कमी करावेत. "

वरील नोटीस जरी सद्धेतूमूलक होती; असें कांहीं मंडळीस वाटलें तरीपण ती कांहीं मंडळीस पटली नाहीं असे ऐकिवांत आहे.

सातार्‍याचा मुक्काम आटोपून फलटणास छोटासा मुक्काम करून मंडळी पुण्यास आली. भाऊराव वारल्यानंतर जोगळेकरांना स्टेजवर पाहण्यास किंवा गोरे गेल्यानंतर गंधर्वास पाहण्यास पुणेकर जसे उत्कंठित होते, तसेच जोगळेकरानंतर टेंबे यांना पाहण्यास लोक उत्कंठित झाले होते. पुणें येथील पहिले दोन खेळ म्हणजे शनिवारीं रविवारीं अनुक्रमें मूकनायक व मानापमान असें जाहिर झाले होते. सदर नाटकांत विक्रांत व धैर्यधर याची भूमिका फलटण मुक्कामापर्यंत टेंबेच करीत होते. परंतु टेंबे यांना असे कळलें कीं, पुणें येथें पहिल्या खेळांत गोरे विक्रांताची भूमिका करणार आहेत. त्यांना मुजुमदारांनीं नोकरीवर रुजूं करून घेतले आहे. लेले व टेंबे कांहीं नाटकांत एकत्र होते. लेल्यांचा आवाज ऐनवेळीं बरोबर काम देत नाहीं म्हणून टेंबे त्याची फिकीर करीत नव्हते. आपण जोगळेकराचे जागीं प्रमुख नायकाचे काम करून पुण्याचे प्रेक्षकांस मोहून टाकून पुणें मुक्कामीं पहिला नंबर मिळवूं ही आशा टेंबे यांना लागून राहिली होती. ती ऐन-वेळीं गोरे यांना विक्रांताची भूमिका दिल्यामुळें दुभंग झाली. मुजुमदारांचे राजवटींत पहिल्या तीन मुक्कामांत द्रव्य व यश चांगलें संपादन झालें. परंतु या तिन्हीं मुक्कामांत तीन नट नाराज जाहले म्हणजे किर्लोस्कर मंडळीचे कीर्तीमंदिराचे तीन आधारस्तंभ नाट्यकलाकुशल, रंगभूमीविभूषक

भूषणत्रय लौकरच मंडळीस अंतरणार अशी अफवा मंडळीस उठली. वरील अफवेंत पंढरपूर व बार्शी या मुक्कामांत भर पडली. बालगंधर्वांचें पहिल्या-पासून प्रत्येक नाटकांत नायिकेचें काम होतें. असें एकही नाटक नाहीं कीं, त्यांत बालगंधर्वांचें काम नाहीं. परंतु पंढरपूर व बार्शी मुक्कामीं शारदा नाटकांत बालगंधर्वाची मुळींच भूमिका नाहीं असें जाहलें.

## आंगरखा व पगडीचे पोषाखांत!

पण मौजेची गोष्ट ही कीं, शारदा नाटकांत नांदीचे वेळीं सूत्रधारा-बरोबर पांढरा अंगरखा घालून रेशमी धोतर परिधान करून शिरोभूषण पगडी घालून तबकांत फुले असलेले चांदीचे तबक हस्तीं घेऊन एका बाजूस पारिपार्श्वक म्हणून नटसम्राट बालगंधर्व उभे होते.

मात्र पारिपार्श्वकाची भूमिका त्यांना कोणी करावयास सांगितली किंवा त्यांनीं आपल्या मनानें घेतली होती, हें कांहीं कोणास सांगतां येत नाहीं. तरी पण बालगंधर्वांनीं तें काम हौसेनें व मौजेनें केलें असें ऐकिवांत आहे. याच पंढरपूरच्या मुक्कामांत बाबुराव गाडे यांनीं शेवटच्या मानापमान नाटकांत लक्ष्मीधराची भूमिका केली होती. ( १९१२ ते १३ )

पंढरपूर मुक्कामांत शेवटचे मानापमान नाटक बोडसाच्या लक्ष्मीधराच्या कामाच्या विरहीत प्रथमच जाहलेले पाहून बोडस नाराज झाले. नंतर बार्शी मुक्कामीं कांहीं नाटकें श्री. टेंबे यांची चारुदत्ताची भूमिका श्री. गोरे यांना दिल्यामुळें ते नाराज झाले असे ऐकिवांत आहे. नंतर लातूरचा छोटा मुक्काम संपवून किर्लोस्कर कंपनी पुण्यास आली. एक महिन्यांनीं श्री. खाडीलकरांचे विद्याहरण नाटक प्रथमच रंगभूमीवर आलें व त्याच सुमारास एके दिवशीं सकाळीं पुणें किर्लोस्कर थिएटरमध्यें मॅनेजर ऑफिसांत श्री. शंकरराव मुजुमदार बसले असतांना आम्ही एक महिन्यांनीं किर्लोस्कर मंडळीची नोकरी सोड-णार अशी लेखी नोटीस श्री. बालगंधर्व, श्री. टेंबे व श्री. बोडस या त्रिवर्गांनीं दिली. ता. १९ जून १९१३ ) १९ जुलै १९१३ पासून १९३४ सालअखेर बालगंधर्व गं. मं. चे मालकीचे गादीवर आहेत.

मुदत ठरल्याप्रमाणें एक महिन्यानंतर किर्लोस्कर मंडळीचे प्रसिद्ध नट श्री. बालगंधर्व, श्री. टेंबे, श्री. बोडस यांनीं आपले नोकरीची इतिश्री येथें करून पुणें ढमढेरे यांचे बोळांतील एका भव्य वाड्यांत गंधर्व नाटक मंडळीची स्थापना केली. किर्लोस्कर मंडळीची फूट पडूं नये. आहे या स्थितींत उत्कृष्ट राहावी या प्रीत्यर्थ श्रीमन महाराज शाहु छत्रपती कोल्हापूरकर, यांनीं मुद्दाम बालगंधर्व यांना कोल्हापुरास बोलावून घेऊन पुष्कळ समजाविले त्याचप्रमाणें श्रीयुत नरसोपंत केळकर, आणि कै. रा. ग. गडकरी वगैरे मोठमोठ्यांनीं मनस्वी प्रयत्न केले परंतु त्यांचे प्रयत्नास यश आलें नाहीं. उभयपक्षांत समेट न होण्यास जीं किरकोळ कारणें त्यावेळीं ऐकावयास मिळालीं तीं वर निवेदन केलीं. यापेक्षां महत्त्वाचीं कारणें कोणतीं तीं उभयपक्षासच माहिती असणार.

---

## बालगंधर्व आणि गॅरिक.

### बालपण.

इंग्लंडमधील प्रसिद्ध नट गॅरिक बाल्यावस्थेंत असतां एके दिवशीं माडीवरील दिवाणखान्याच्या खिडकींत उभा राहून रस्त्याची मौज पाहात उभा होता. इतक्यांत त्या रस्त्यानें एक सोल्जर आपल्या मिशा रुबाबांत ताठ करून पिळीत छाती पुढें करून ऐटीनें बुटाची पावलें टाकीत छानछोकपणानें रस्त्यानें चालला होता. ते वैशिष्ट पाहून गॅरिकनें आपल्या दिवाणखान्यांतील आरशाकडे अनुकरणप्रियतेनें पाहून त्याची नक्कल करण्याचा प्रयत्न आरंभिला. हा प्रसंग त्याचे वडिलानें दुरून पाहून लक्षांत घेतलें कीं, आपल्या मुलास इतर धंद्यांत घालण्यापेक्षां नटवर्गांत याला गोविल्यास हा अनुकरणप्रियतेमुळें जास्त प्राविण्य संपादन करील. या पितृसंकल्पाप्रमाणें पुढें तो उत्तम नट बनला आणि इंग्लंड व युरोपखंडांमध्यें यांचें नांव या गुणांत प्रसिद्ध आहे. अशी एक सुप्रसिद्ध नट गॅरिक याची बाळपणची आख्यायिका आहे.

त्याचप्रमाणें आमचे बालगंधर्वांची बालपणची एक मनोरंजक गोष्ट आहे. बडोदे येथें श्रीमंत युवराज फत्तेसिंग महाराज यांचे

विवाहप्रसंगी पाहुण्यांचे करमणुकीकरितां मुद्दाम किर्लोस्कर मंडळीस (१९०३ ते ४) आमंत्रण दिलें होतें. तेथील प्रोग्राम आटोपून मंडळी जळगांव येथें गेली. त्यावेळीं जळगांव येथें थिएटर नसल्यामुळें हंगामी तट्टयाचें थिएटर उमे केले होतें. त्यावेळीं किर्लोस्कर मंडळी अत्यंत भरभराटींत होती. पुरुष पात्रांत नटवर्य जोगळेकर यांच्या संगीताबरोबर अभिनयांत व विनोदी कामांत बोडस, चिंतोपंत दिवेकर व कै. परचुरे चमकत होते. सर्व नट एकजात हुशार असल्यामुळें त्यावेळीं तालमी घेण्याची आवश्यकता भासत नव्हती. यामुळे सर्वच नट फावल्यावेळीं पत्त, बुद्धीबळें, क्रिकेट वगैरे खेळांत निमग्न असत; किंबहुना दररोज दुपारीं ४ वाजतां हंगामी थिएटर जवळील मोकळ्या पटांगणांत क्रिकेटचे खेळ चालत असत त्यावेळीं ही मौज पाहण्याकारितां शाळेतलि विद्यार्थी तेथें जमत त्या विद्यार्थ्यांमध्यें राजहंस हा विद्यार्थी होता. हा तेथें येऊन मंडळीना मोठ्या कौतुकानें पाही व कंपनीतील गुंडू वालावलकर या मुलाबरोबर मैत्री संपादन करून राजहंस नित्य नियमानें मंडळींत येई. [ गुंडू वालावलकर हा मुलगा चंद्रहास, बकुल, शारदा इत्यादि पात्रांच्या भूमिका घेई. हेच पुढें रा. गुंडोपंत वालावलकर म्हणून श्री. टेंबे यांचे पट्टशिष्य झाले. श्रीमंत महाराज फलटणकर यांचे पदरीं हार्मोनियम मास्तर होते व हल्लीं कोल्हापूर सिनेटोनमध्यें म्युझिक डायरेक्टरचे हुद्यावर आहेत. ] ते पाहून नटवर्य बोडस विनोदानें म्हणाले " बाळ, तूं नेहमीं आमचेकडे येऊन बसतोस खरा पण नाटक मंडळीचे संसर्गानें तुझे मन विद्याध्ययनाकडून निघून नाट्यकलेचाच अभ्यास करावा असें तुला वाटेल " पण अखेरीस हेच विनोदाचे बोल खरे ठरले. एके दिवशीं पडदे सोडतांना बाल राजहंस तट्टयांतील विवरांतून नाट्यकलेतील निरनिराळे सीन कसे मांडतात व पडदे कसे सोडतात वगैरे अवलोकन करीत होता. पण तेवढ्यानें त्याचे समाधान न होऊन सर्वांची मर्जी संपादन करून रंगभूमीच्या आंत प्रवेश करून सिनसिनरी सर्व गोष्टी बारकाईनें व कौतुकानें पाहात असे. अशी त्याच्या भावी चरित्राची चिन्हें बाल्यावस्थेंत दिसूं लागली.

मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात बाल्यावस्थेवरून मुलाचे भावी आयुयातील धंद्याची कल्पना आंखता येते. बालवयांत मोरोपंतांनी जात्यावरील ओव्या

करून भावी कवित्वाची जाणीव करून दिली. लोकमान्यांचा बालपणातील हट्टी व करारीपणा पुढील आयुष्यांतील ओजस्वीपणाची साक्ष देत होता. स्वामी विवेकानंद रामरूपी समाधीमग्न बालपणीं असत त्याचप्रमाणें नट गॅरिक आपल्या पित्यास बालपणीं आपल्या भावी कार्यक्रमाचे ओजस्वीकिरण दाखवीत होता; तद्वतच आमचे नटसम्राट बालगंधर्व अर्थात् बाळ राजहंस आपल्या उत्तर चरित्रांतील झुळूक बाळपणीं दाखवित होते. कित्येक प्रसंगी मातृपितृ दैवतांचे किंबहुना तृषा व आहाराचे भान विसरून गायन ऐकत असत. गॅरिकचे वडिलाप्रमाणें बालगंधर्वांचे पितृदैवत जर विचारी असते तर आमचे राजहंस बाळ तात्काळ किर्लोस्कर मंडळींत दाखल जाहले असते.

## हनुमान उड्डाण

बालगंधर्व वगैरे मंडळीची महिन्याची नोटीस पुरी होताच किर्लोस्कर मंडळीतील बरीच मंडळी आणि आणखी दुसरीकडील मंडळी गंधर्वास मिळाली व सर्व मंडळीचा स्टाफ् गंधर्वांजवळ झाला व गंधर्वमंडळीचा जन्म झाला. राजेरजवाडे जहागिरदार वगैरे मंडळीकडून भरजरी कपडे, पटके, शालू, वगैरे गंधर्व मंडळीचा प्रथम प्रयोग होण्यापूर्वीच त्याना मिळाले. श्री. त्रिंबकराव साठे मॅनेजर प्रारंभी लाभल्यामुळें प्रथमपासूनच पोक्तपणाचा सल्ला मिळाला. गंधर्व नाटक मंडळीचा पहिला खेळ नामदार सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांचे हस्तें उद्घाटन झाला. ह्या खेळास प्रारंभ होताच रसिक प्रेक्षकांत आनंदी आनंद, उत्साह आणि प्रेम चमकत होते. त्याचे पर्यवसान गंधर्व नाटकमंडळीस अनकूल असेच जाहले. अवघ्या तीन महिन्यांत सुमारें २३००० तेवीस हजार रुपये मिळून श्रीमान् महाराज सयाजीराव महाराज आपल्या लवाजम्यासह प्रयोग पाहण्याकरितां मुंबापुरीस आले आणि संतोष व्यक्त करून वार्षिक ५००० रुपये वेतन देण्याचे कबूल केले व गंधर्व मंडळीस पेट्रोनाईज केले. मात्र दरसाल बडोदे मुक्कामी ५ खेळ करून हे ५००० रुपये दरबारकडून घ्यावेत, असें ठरलें. प्रास्ताविक भांडवलाकरितां जाहलेले कर्ज अवघ्या तीन महिन्यांत फिटून राजाश्रय मिळाला खरा पण तत्पूर्वी दोन संकटे गंधर्व मंडळीवर डोकावत होती. सौभद्र, शाकुंतल, रामराज्य-

वियोग हे प्रयोग करण्यास परवानगी मिळणार नव्हती पण ती ही प्रयासानें मिळाली. नवीन नाटक " मानापमान " गंधर्वास मिळणार कसे हा प्रश्नही हायकोर्टापर्यंत जाऊन सुटला. " सौभद्र " व " मानापमान " ही नाटकें गंधर्वास सुरवातीस जर मिळाली नसती तर कंपनीचा जन्म होऊनही त्या काळीं फुकट ठरला असता. कारण याच नाटकाचे जोरावर सुरवातीस कीर्ति व संपत्ति प्राप्त जाहली आणि गंधर्व मंडळीचा जम बसला.

कोणतीही नाटक कंपनी स्थापन करणें हें कार्य बाह्यतः जितके सोपें दिसते तितके वस्तुतः कठीण आहे. प्राथमिक व्यवस्थेंकरितां उभारलेले कर्जावर कंपनी जन्म घेते आणि बाल्यावस्थेंत कंपनी लोळू लागते. कंपनीवरील कर्जबोजा जसजसा कमी होत जातो तसतसी कंपनी रांगू लागते आणि कालांतरानें. कंपनी स्वतःचे पायावर उभी राहते नंतर आनंदानें नाचूं बागडूं लागते आणि आपल्या गुणवैशिष्ट्यावर मोठमोठ्या शहरांना प्रयाण करूं लागते. आणि मोठ्या मिनतवारीवर व वशिल्यावर आणि मगदुरावर राजाश्रय मिळवते.

श्री हनुमानानें जन्मतांच सर्व विश्व ओलांडून क्षणार्धांत एकदम सूर्यमंडळ गांठलें. त्याप्रमाणेंच आमच्या गंधर्व नाटक मंडळीनें जन्मतांच व्यवहारांतील खडतर अडचणी ओलांडून राजाश्रय संपादला आणि यशस्वी-रीतीनें बडोदें गांठले. ही गोष्ट खरोखरच प्रशंसनीय होय आणि पौर्वात्य नाट्यकलेच्या इतिहासांत सुवर्णाक्षरानें लिहिण्यासारखी आहे.

---

## बालगंधर्वांची गंधर्व मंडळीस नोटीस

गंधर्व नाटक मंडळी बडोद्याचा मुक्काम संपवूंन इंदूर, औरंगाबाद वगैरे गांवें घेत सुयश संपादित वर्षअखेरीस पुणें मुक्कामीं आली. अगोदरच गंधर्वांची कीर्ती पुणेंकरांना पूर्ण अवगत होती. त्यांत त्यांची स्वतंत्र उत्कृष्ट नटांची कंपनी म्हणोन तिनें आपल्या मुक्कामांत पुणेंकरांना थक्क करून सोडले. कंपनीचा प्रथम वाढदिवस पुणें येथेंच मोठ्या थाटानें साजरा

झाला. त्यानिमित्त श्रीसत्यनारायणाची पूजा करण्यांत आली. प्रसाद, पानसुपारी व भोजन समारंभ फार अपूर्व जाहला. प्रथम वर्षांत मिळविलेल्या सुयशाबद्दल गंधर्व मंडळीनें आपल्या सर्व नोकराना एक महिन्याचें पगाराचे पारितोषक दिलें.

वाचकवर्गास माहीत आहे कीं, गंधर्व मंडळीचे मुख्य तीन भागीदार होते. श्री. बालगंधर्व, श्री. टेंबे आणि श्री. बोडस. या तिघांत कंपनी स्थापन करतांना करार झाला तो असाः—

" कंपनी स्थापन होऊन जर एकादे भागीदारास पांच वर्षांचे आंत कंपनी सोडून जाणें भाग पडले तर त्यानें नुकसानीदाखल २००० रुपये कंपनी चालू ठेवणाऱ्या भागीदारांस द्यावे व जाण्यापूर्वी सहा महिने अगोदर कंपनीस नोटीस दिली पाहिजे. अशा रीतीनें कंपनी सोडून गेल्यास त्याचा कंपनीच्या मालमत्तेवर कोणत्याही प्रकारे संबंध राहणार नाहीं. "

बालगंधर्वांचे परममित्र धोरणी, व्यवहारपटु व नाट्यकलाहितचिंतक मॅनेजर श्री. पंडित स्वगृहीं असतांना आपल्या मंडळींत ते असावे असे बालगंधर्वास वाटणें स्वाभाविक आहे. आणि त्याप्रमाणें गंधर्वांनीं त्यांना पाचारण केले. परंतु ही गोष्ट दुसऱ्या भागीदाराना आवडली नाहीं. नावडती गोष्ट आपले हातून होते आणि एका चांगल्या माणसाला आपण अंतरतो या सबबीवर गंधर्वांनीं आपण भागिदारी सोडून जाणार. अशी ६ महिन्याची तोंडी नोटीस दिली. कराराप्रमाणें नुकसानीदाखल रुपये २००० देतो असे आपल्या भागिदारांना कळविले.

बालगंधर्व नाहींतर ती गंधर्व मंडळी कसली ? ही गोष्ट सर्वांचे मनास कळून मग सर्वांची दिलसफाई होऊन श्री. के. पी. ऊर्फ बाळासाहेब पंडित मॅनेजरच्या जागेवर रुजु झाले. व त्यावेळीं सर्वत्र पुन्हां शांतता जिकडे तिकडे गंधर्व मंडळींत झाली.

देवादिकांचे वेळीं " कृष्णार्जुन युद्ध " हे जसे नवल, त्याचप्रमाणें बालगंधर्वांचीच गंधर्व मंडळीस मी कंपनी सोडून जातो ही खडखडीत स्पष्ट नोटीस हे तरी नवलच नव्हे काय ?

## एक अपूर्व गुह्य.

अडीच तीन लाख रुपये गंधर्व मंडळीस कर्ज होतें हें जगजाहीर आहे. त्याकाळीं मे. लाडसाहेब यांनीं नेमलेले मॅनेजर कै. दादासाहेब काटदरे हे कंपनीचा खर्च वजा जातां प्रत्येक आठवड्यास भराभर हजारो रुपये कर्ज-फेडीकरितां सहज पाठवीत होते. एके काळीं तर हैद्राबादहून हुबळीस मुक्काम जातेवेळीं पहिल्या खेळाची तिकिटविक्री आगाऊ तिकडे सुरू केली व त्यातूनच हजारों रुपये आणून हुबळीस मुक्काम बादशाही थाटानें सहज नेला. पण त्याच गंधर्व मंडळीची सुरवातीच्या प्रथम वर्षांत जळगांवांत मेघराजाचे अवकृपेंत सांपडलेली असतांना तिची स्थिती अनुकंपनीय होती.

तेथून नागपुरास जातांना कंपनीजवळ भाडेखर्च वजा जातां हाताचे बोटावर मोजण्याइतकी रक्कम शिल्लक होती कीं नव्हती ही अंतःसृष्टींतील गोष्ट घट्कर्णी होऊन बाह्यसृष्टींत उतरली असती तर कंपनीचे तारु वादळांत सांपडून त्याला खास जलसमाधी मिळाली असती. पण कंपनीचे संचालक फारच धिम्मे कर्तव्यदक्ष व्यवहार चतुर आणि प्रसंगास तोंड देणारे. त्यांनीं सर्व कामे रुबाबांत करून वेळ शांतपणानें सांभाळली. म्हणुनच नागपूर मुक्कामांत कंपनीस हजारो रुपये मिळाले.

ज्या कंपनीचा मुक्काम हलण्यापूर्वी दुसरे ठिकाणीं हजारों रुपये तिकीटविक्री येते त्याच कंपनीस जळगांवाहून नागपुरास जातांना हलाखीची स्थिती यावी हें खरोखरच आश्चर्य होय. गुप्तपणाचे गुह्यामुळें कंपनी सावरली. हे तत्कालीं दाखविलेल्या गंधर्वाच्या प्रसंगावधानाचे व धिम्मेपणाचे कौतुक करावे तितके थोडेच.

---

## प्रेक्षकाचे अभावी खेळ बंद

गंधर्व नाटक मंडळी येणार येणार अशा जाहिराती प्रत्येक मुक्कामी कित्येक दिवस आगाऊ लागत असतात. प्रेक्षक तारखेकडे लक्ष देतात.

आनंदाचे भरते येते. मुक्कामाचे आसपास शंभर मैलापर्यंतचे लोक अगोदरच तारेनें पैसे पाठवून जागा रिझर्व करितात. कोण बोलबाला. पण दुसऱ्याच वर्षाचे आरंभीं अहमदनगरचा मुक्काम 'फेल') झाला नंतर जळगांवचे मुक्कामांत मेघराजानें अवकृपा कंपनीवर केली. मुसळधार पाऊस. दाराबाहेर पडण्याची सोय नाहीं. अशावेळीं थिएटरमध्यें फक्त दोनच प्रेक्षक आणि उत्पन्नही दोन रुपयेच फक्त. बालगंधर्वांच्या सर्व आयुष्यक्रमांत असा प्रसंगच आलेला नाहीं. जेथें मुसळधार पाऊस असूनही दीड दोन हजार रुपये खेळाचें उत्पन्न बालगंधर्वांनीं गंधर्व मंडळीच्या वीसबावीस वर्षाच्या सर्व हयातींत हमखास घेतले तेथें दोन रुपये उत्पन्न आणि तेही प्रेक्षकास खेळाभावी परत द्यावें लागलें. ही एक सुस्मरणीय अशी गंधर्वांची नवलकथा आहे.

गंधर्व नांवावर लोक गंधर्व कॅप, गंधर्व फ्ल्यूट, गंधर्व मंडळीचे नट इत्यादि नांवें संबोधून थोडें तरी सुयश मिळवतात. पण एक वेळ गंधर्वांना फक्त दोनच रुपये उत्पन्न येतें हा अपूर्व व विचित्र योगायोग होय.

डेक्कन हॉटेल
सोडा, लेमन, खारी, नानकटाई, मस्कारस्लाइज, केक
ताजा व स्वच्छ माल मिळण्याची उत्कृष्ट व्यवस्था
लक्ष्मीरोड, गणपती चौक, पुणें.

# गंधर्व मंडळीचे अपत्य

किर्लोस्कर मंडळींत श्री. टेंबे यांच्या तोडीस दोन हीरो श्री. गोरे व श्री. लेले असल्यामुळें मधून मधून श्री. टेंबे यांना विश्रांति मिळत असे. पण गंधर्व मंडळी स्थापन होताच

टेंभे हेच काय ते एकटे हिरो असल्यामुळें प्रत्येक खेळांतील हीरोची भूमिका टेंब्यावर पडत असे. अगोदर कामातिरेकामुळें एखादे प्रसंगीं त्याचा आवाज बसत असे. म्हणून दत्तोबा पेठकर यानां आपल्या पैकीं बरींच कामें टेंबे यांनीं शिकविली. नाशिक येथें गंधर्व कंपनीचा मुक्काम असतांना श्री. टेंबे मुंबईस औषध घेण्याकरितां गेले असें मंडळीस कळले. पण लौकरच ते कायमचेच गेलें असें कळलें. गंधर्वमंडळींत असतांना त्यांना ५००० पांच हजार रुपये मिळाले आणि कंपनी सोडतांना ७००० सात हजार रुपये मिळाले. अर्थात् एकंदर १२००० बाराहजार रुपये टेंबे यांना गंधर्वमंडळींतून मिळाले.

गंधर्व नाटकमंडळी नाशिकमुक्काम आटोपून मुक्काम घेत घेत हैद्राबाद येथें गेली. तेथें टेंबे नवीन कंपनी काढणार अशी वंदता पसरली होती. कंपनीतील कांहीं मंडळीं या नूतन कंपनींत सामील होणार असल्याचे ऐकिवात आले. म्हणून श्री. बोडस यांनीं सर्वास कळविलें कीं ज्याना जावयाचे असेल त्यांचा पगार आम्हीं चुकतां करितो. त्याप्रमाणें २२-२३ मंडळी हिरो, सब-हिरोखेरीज ॲक्टर व इतर कामें करणारे कामगार निघून गेले. दुसरे दिवसाच्या मृच्छकटिक नाटकाश किरकोळ पात्राच्या कामाचा इतका तुटवडा भासला कीं गंधर्व मंडळीच्या वस्त्रागारावरील हल्लीं असलेला मुख्याधिकारी श्री. जामदार ( बाल्यावस्थेंत १८ वर्षाचा असतांना ) यांनीं नटाचे कधींही काम केलेले नसतांना त्याला धुतेचे काम द्यावे लागले. याच वेळीं सुरवातीपासून असलेले गंधर्वमंडळीचे साथीदार श्री. राजाराम बापू पुरोहित व श्री. दादा लाडू ( हार्मोनियम मास्तर व तबला मास्तर ) ही जोडी निघून गेली. व त्यांचे जागीं साथ करीत तेथें असलेले हंगामी हर्मोनियम मास्तर आणि सदर पुस्तकाचे लेखक हेहीपण निघून गेले (लेखकास आपल्या हातून मोठे पाप जाहले ह्याची जाणीव आहे. )

श्री. टेंबे वगैरे गंधर्व नाटक मंडळींतून निघून गेल्यानंतर गंधर्व नाटक मंडळीस शिवराज नाटक मंडळी हें प्रथमापत्य जाहलें आणि त्याला राजाश्रय मिळाला. श्रीमन् महाराज शाहू छत्रपती यांचे आश्रयाखालील शिवराज संगीत नाटक मंडळी या नांवाची श्री. टेंबे यांनीं नवीन कंपनी स्थापन केली.

## किर्लोस्कर संगीत मंडळी

गंधर्व नाटक मंडळी—मालक श्री. बालगंधर्व, श्री. टेंबे, श्री. बोडस

बलवंत संगीत मंडळी मालक श्री. दिनानाथ, श्री. कोल्हटकर, श्री. कोल्हापुरे.

शिवराम संगीत मंडळी
मालक श्री. टेंबे

श्रीमन्महाराज सवाई तुकोजीराव होळकर यांचे आश्रयाखालीं
यशवंत संगीत मंडळी
प्रथम चालक श्री. सरनाईक, श्री. भडकमकर, श्री. भाऊराव जाधव
डायरेक्टर्स नटवर्य बोडस

श्री रमाकांत संगीत मंडळी
मालक श्री. पांडोबा क्षीरसागर, श्री. पांडोबा भोसले.

**टीप:** श्री. नटवर्य गणपतराव बोडस यशवंत संगीत मंडळीचे डायरेक्टर एक वर्षपर्यंत होते. बोर्डानें दिलेल्या पूर्ण अधिकारानें एकटेच ते व्यवस्था पहात होते. एक वर्षानंतर सुमारें ९ प्रमुख नटांच्या ताब्यांत चालविण्यास ते कंपनी देणार होते. तसा ड्राफ्टही लिहून तयार केला होता. परंतु बोर्डाचे सेक्रेटरी श्री. हुदलीकर यांचा सल्ला घेऊन आपला डायरेक्टरचा अधिकार श्री. शंकरराव सरनाईक यांना नटवर्य बोडसांनीं दिला, अशी खात्रीलायक हकीगत त्या वेळीं मंडळींत पसरली होती.

डायरेक्टर नटवर्य बोडस यांना मानापमान नाटकाचे वेळीं नागपूर मुक्कामीं १९२१ मध्यें यशवंत मंडळींतील सर्व मंडळीकडून कै० अच्युतराव कोल्हटकर यांच्या हस्तें मानपत्र मिळालें.

श्री. सरनाईक, श्री. भडकमकर, कै. भाऊराव जाधव इ० प्रमुख नटांच्या त्या मानपत्रावर सह्या आहेत.

नटवर्य बोडसांच्या फाल्गुनराव, लक्ष्मीधर, शकार इ० हास्यरसाच्या भूमिका यशवंत मंडळीचे सुरवातीस व बोडस निघाल्यानंतर पां. ग. क्षीरसागर (लेखक)च करीत होते. अर्थात् वरील इतिहास स्वानुभवाचा आहे.

## मौजेच्या आठवणी

( १ ) एकदां बालगंधर्व कांहीं कामाकरितां व्हिक्टोरियांत बसून बाहेर पडले. काम आटोपून मंडळीचे बिऱ्हाडीं परत आले. त्या वेळीं मुक्काम मुंबईत होता. व्हिक्टोरियावाल्यास विचारलें, " तुला किती पैसे द्यावयाचे ? " त्यानें सांगितले " साहेब ? मी आपलेकरितां दोन तास खर्च केले. नियमाप्रमाणें दोन तासाचे अमुक पैसे होतात ते द्यावेत म्हणजे झाले. "

व्हिक्टोरियावाल्याचे हे शब्द ऐकतांच बालगंधर्व म्हणाले " अरे, माझी भीड धरून इतके थोडें पैसे सांगतोस. तुला आमचें नाटक पहावयाचें असल्यास त्याबद्दल कांहीं काळजी करूं नकोस. तूं आपले भरपूर पैसे घेतलेस तरी मी रागावणार नाहीं. उद्यां नाटकाला सोडण्याबद्दल मी बाळासाहेब पंडित यांना सांगतों. "

( २ ) एकदां मुंबईस मुक्काम असतांना गंधर्व मंडळीस २ वाज्याच्या पेट्या घ्यावयाच्या होत्या. तेव्हां बालगंधर्व एका स्नेह्यासह पेट्या खरेदी करण्यास गेले. कोटांतील सर्व दुकानें पाहिलीं. अखेरीस काळबादेवीरोडवरील टी. एस. रामचंद्र यांच्या दुकानांतील दोन हार्मोनिअम पेट्या त्यांना पसंत पडल्या. त्यांनीं मालकास किंमत विचारली. मालकांनीं किंमत सांगितली.

बालगंधर्व म्हणाले " अहो, अगोदर लढाईचे दिवस. सर्व माल महाग. किंमती दुपटीतिपटीनें वाढल्या आहेत. असें असतांना तुम्ही आम्हांला इतकी थोडी किंमत सांगतां—काय हें आश्चर्य ? आम्ही तुमचे जुनें गिऱ्हाईक आहोंत म्हणून आपणांकडेच माल घेत जाऊं. मात्र आपण आपले नुकसान करून घेऊं नका. भरपूर किंमत सांगा. आम्हांला त्याबद्दल कांहीं वाटणार नाहीं." हें बोलणें चालूं असतांना मालक व स्नेही यांना आश्चर्यभरांत अत्यंत हसूं आलें व त्यांच्या उदारपणाबद्दल आदर वाटला.

## बालगंधर्वास निस्तेज करीन

केशवराव भोसले यांनीं किर्लोस्कर मंडळींतील बालगंधर्वाशीं जितकी स्पर्धा केली तितकी दुसऱ्या कोणत्याही नटानें केली नसेल. नटसम्राट् बालगंधर्व व केशवराव यांचे भेटीचा योग १९०५ मध्यें प्रथम दर्शनीं आल्यापासून अखेर संयुक्त मानापमान होईपर्यंत मधूनमधून भेटीचा योग सारखा येत होताच. श्रीमन्महाराज छत्रपती शाहू महाराजांपुढें नटवर्य बालगंधर्व व केशवराव भोसले यांचें गायन प्रथम १९०५ सालीं कोल्हापूर मुक्कामीं झालें. नंतर लागलीच बालगंधर्वांचा

किर्लोस्कर मंडळींत प्रवेश झाला. प्रथमारंभीं किर्लोस्कर मंडळी बॉंबे थिएटरमध्यें मुंबई येथें असतांना केशवराव स्वदेशी हितचिंतक मंडळीमध्यें समोरच एल्फिन्स्टनमध्यें होते. (त्यावेळीं केशवराव भोसले स्व. हि. ना. मंडळींत नोकर म्हणून होते) इकडे किर्लोस्कर मंडळींचें सौभद्र तर तिकडे स्वदेशहितचिंतकेचें सौभद्र. इकडे बालगंधर्व सरोजनी (मूकनायक नाटकांत तर तिकडे केशवराव सरोजनी, त्यांची शारदा तर त्यांची शारदा.मात्र त्या वेळीं किर्लोस्करांचा पीटचा दर८८होता. स्वदेश हितचिंतकचा पीटचा दर ८४ च आणे असे. तरी बालगंधर्वाचें गायन ऐकण्याकरितां मुंबापुरी संपूर्ण बॉंबे थिएटरांतच लोटे. नैसर्गिक सौंदर्य, गोड गायन,मधुर आलाप, शृंगारकलानैपुण्य हें पाहून गंधर्वांनीं लोकांचीं मनें त्या वेळीं आकर्षून घेतलीं होती. दोघेही बालनट उत्तम खरे! तथापि नैसर्गिक सौंदर्यविहीन आणि आवाज फुटण्यास नुकतांच प्रारंभ होत असल्यामुळें, केशवराव भोसले यांचेपेक्षां बालगंधर्वाकडेच जनतेचें लक्ष लागे.

त्यानंतर श्रीमंत अक्कासाहेब महाराज कोल्हापुर यांचे लग्नाच्या वेळीं किर्लोस्कर मंडळीस मुद्दाम करवीर येथें श्रीमन्महाराज यांनीं बोलाविलें होते. त्या वेळीं केशवराव भोसले यांनीं स्वतः स्थापन केलेली नवीन कंपनी ललितकलादर्श मंडळी सांगली येथें होती. केशवरावांची नवी कंपनी त्या वेळीं बाल्यावस्थेंत होती. एकदोन वर्षांचे अनुभवानें केशवराव त्रासून गेले होते, असें त्यावेळीं ऐकिवात होते, म्हणून नानासाहेब जोगळेकर यांनीं लग्नसमारंभाकरितां आलेल्या केशवरावांना श्रीमत् छत्रपतींचे सल्ल्यानें बालगंधर्वाबरोबर केशवराव यांचे आवडीतील सर्व मंडळी किर्लोस्कर मंडळींमध्यें सामील करण्याचें ठरलें. त्या वेळीं देवल क्लबांत श्री. केशवराव भोसले व श्री. बालगंधर्व यांचें गायन झालें. केशवराव किर्लोस्कर मंडळींत राहणार हें जवळजवळ ठरलें पण केशवरावाचे स्वदेश हि. मं. चे पूर्वीचे मालक अनुभाऊ निमकर यांनीं भेटून केशवरावास समक्ष सांगितलें कीं, जर दोघांचे एके ठिकाणीं काम करण्याचे या वेळीं योग आले तर त्यांत सरसानिरसपणा ठरून गंधर्वांचा पहिला नंबर लागेल व तुझा नंबर २ रा लागेल. जोंपर्यंत बालगंधर्व व केशवराव वेगळ्या स्टेजवर आहेत तोंपर्यंतच दोघांनाही प्रेक्षक समान दर्जानें पाहतील. म्हणून तूं किर्लोस्कर मंडळींत जाऊं नकोस. अनुभाऊचा उपदेश केशवराव यांना रुचला व त्यानंतर त्यांनीं स्वतःच्या मंडळींत कायम राहण्याचें मात्र ठरविलें. तेव्हांपासून केशवराव यांचे मनांत विलक्षण ईर्षा उत्पन्न होऊन 'मी बालगंधर्वाचे तोडीचा

तंतोतंत नट होईन इतकेंच नव्हे तर रंगभूमीवर मी त्यांना निस्तेज करीन,' अशी त्यांनीं घोर प्रतिज्ञा केली, असें म्हणतात.

जमिनीवर सरपटणारी आरंभीची लुली पांगळी ललितकला संगीतमंडळी लौकरच उंच अशा आकाशांत भराऱ्या मारूं लागली.

## नटसम्राटांचें नाट्ययुद्ध

नटसम्राट केशवराव हे उच्च हेतूनें प्रेरित होऊन किर्लोस्कर मंडळींच्या उच्चउच्च नाटककारांचीं नाटकें बसवूं लागले. त्याचप्रमाणें आपल्या ललितकला मंडळीचा पीटचा दर ८८ केला. परंतु आपले मनानें ठरविलेले प्रतिस्पर्धी बालगंधर्व यांनीं स्वतंत्र नाटक मंडळी स्थापन केली आहे तेव्हां तिच्याबरोबर स्पर्धा करण्यास प्रारभ केला (वास्तविक बालगंधर्व व केशवराव भोसले या उभयतांमध्यें पांडवाप्रमाणें बंधूप्रेम होते परंतु केवळ कलेंत बालगंधर्वास जिंकावें अशी प्रबल इच्छा आमरण केशवरावांच्या हृदयांत होती) ललितकला व गंधर्वमंडळी एकच सरळ रेषेंत आहेत. असें प्रेक्षकांस दिसावें म्हणून केशवरावांनीं नाट्यरणाची तयारी चालविली आहे असें प्रेक्षकांस दिसून येत होते. रूपसौंदर्यांत जरी उणेपणा आहे, तरी रूपसौंदर्य-भामिनीची भूमिका चाफेकर यांना दिली व तत्कालीं रंगभूमिविभूषक नाटक मानापमान या नाटकाच्या प्रमुख पात्रांची रचना खालीलप्रमाणें केली:

१ केशवराव भोसलेः–धैर्यधर. २ चाफेकरः–भामिनी. ३ दत्तोपंत भोसलेः–लक्ष्मीधर. ४ वालावलकरः–विलासधर. किरकोळ पात्रें केशवराव यांनीं योग्य अशींच ठेवलीं व इतर सजावटी उत्तमोत्तम केल्या. ह्यामुळें केशवरावांची नाट्यकला उच्च दर्जास पोहोंचली. अंतराळीं भराऱ्या मारणाऱ्या गरुडाप्रमाणें गरुडाचे दर्जास सुरवंट अवस्थेंतून सदर कंपनी वर आली आणि आपल्या अंगच्या अलौकिक गुणामुळें महाराष्ट्रावर कीर्तिध्वजा फडकवूं लागली. पण इतकें यश मिळवून केशवरावांना स्वस्थ बसून समाधान होईना आणि म्हणूनच गंधर्व–ललितकलेचे प्रमुख नट एकवटून एकत्र नाट्यप्रयोग करण्याचा योग नाट्यकलाभिज्ञ केशवराव भोसले यांनीं जुळवून आणला, असें समजते. वास्तविक, त्या वेळीं संयुक्त विद्याहरण खेळ होणार होता. मानापमान व सौभद्र हे दोन खेळ त्या वेळीं संयुक्त झाले. मानापमानमध्यें केशवरावाची भूमिका धैर्यधर ही सरस ठरली आणि सौभद्रमध्यें बालगंधर्वाची भूमिका सुभद्रेची श्रेष्ठ ठरली, असें ऐकण्यांत आहे. अशा रीतीनें दोघेही नाट्यरणांत विजयी झाले. ह्या वेळीं मानापमान खेळाचें उत्पन्न १५०००-

वर आले व सौभद्र खेळाचे सुमारे ९००० वर आले त्या वेळीं पहिल्या खुर्चीचा दर २५ रुपये होता व शेवटचा ५ रुपये होता. हे नाट्यरण पाहण्यास सबंध महाराष्ट्रांतून नाट्यकलाचतुर मुंबापुरीस जमले होते. ह्या दोन्हींही नटसम्राटांचा एकवटलेला प्रयोग पाहण्याचा योग खरोखरच अपूर्व होय, हें महत् भाग्य समजावें. प्रत्यक्ष गानदेवतेचा वास असणाऱ्या पात्रांचें एकीकरण जाहल्यावर रंगदेवता कोणत्या वैभवशिखरांवर असेल, त्याची येथें काय कल्पना लेखणीनें लिहून दाखवावी !

केशवराव भोसले यांना कचाच्या भूमिकेपेक्षां धैर्यधराची भूमिका आपली हातखंडा होते असा आत्मविश्वास होता, असें ऐकण्यांत आहे व नाट्यप्रेमी रसिकांस गंधर्व आणि ललितकला या दोन नाटकमंडळ्या लौकरच बहुतकरून कदाचित् सारख्या रेषेंत खास चमकतील असें वाटूं लागलें.

## स्वर्गांतील संवाद !

आपली दुर्बल ललितकला वज्रदेही झाल्याबरोबर व मनांत घोळत असलेली प्रतिज्ञा नाट्यरणांत पुरी केल्याबरोबर आपलें इहलोकचें कर्तव्य पुरें झालें, असें समजून व गांठावयाचें ध्येय तेंही गांठलें ह्या आनंदातिरेकानेंच जणूं काय केशवराव इहलोक सोडून गेले ! आपला जड देह पृथ्वीवर ठेऊन विजयी मुद्रेनें उल्हसित होऊन अदृश्य लिंगदेहानें आण्णासाहेब किर्लोस्कर यांना स्वर्गांत भेटले व म्हणाले अण्णासाहेब, तुम्ही केलेल्या किर्लोस्कर मंडळीच्या उच्चपदाला सुरवातीची माझी लुली पांगळी ललितकला नाटक मंडळी अखेर वज्रदेही करून मी पोहोंचविली. तुमच्या बालगंर्वाबरोबर रंगभूमिरूपी रणांगणावर संगीतकलेचे मी तुंबळ युद्ध केलें. तुमची किर्लोस्कर मंडळी त्याचप्रमाणें तुमच्या बालगंधर्वाची गंधर्वमंडळी जन्मतः मोठ्या थाटामाटानें सुरू झाली होती व पुढें ती नाट्यसृष्टींतील बहारीचें स्थळ होऊन बसली. पण माझी कंपनी प्रथम गरीबीमुळें जुन्यापुराण्या पडद्यावर व साध्यासुध्या पोषाखावर सुरू करून तुमच्या किर्लोस्कराच्या व तुमच्या गंधर्वाच्या तोडीस नेऊन पोहोंचविली आणि नाट्यसृष्टींतील माझी इहलोकची कामगिरी संपवून आज अखंड स्वर्गसुख घेण्याकरितां मी त्वरेनें आलों, याबद्दल माहिती देतांना आनंद होत आहे. तेव्हां अण्णासाहेब म्हणाले " वा केशवा, आपण सर्व एकच आहोंत. माझ्या किर्लोस्कर मंडळींतून निघून माझ्या नारायण राजहंसानें गंधर्व मंडळीस जन्म दिला.—तें मूल माझें, किर्लोस्कर मंडळीचे व जनुभाऊ निमकर यांनींही माझ्या किर्लोस्कर मंडळींतुन निघून स्व. हि. मंडळीस जन्म दिला.

तेंही मूल माझ्याच किर्लोस्कर मंडळीचें. व तूं स्वदेश हितचिंतक मंडळींतून निघून ललितकला मंडळीस जन्म दिलास तेंही मूल अर्थात् माझेंच! ॥पुत्रापोटीं पुत्र होय तरी स्वर्गाधिक सुख त्याला ॥ असें जें मी काव्यरुपानें लिहिलें तें अगदीं सत्य आहे. खरोखर या वेळीं मला स्वर्गानंद झाला आहे. तर केशवा, तुझें मृत्यु-लोकींचें महत्कार्य संपलें, आतां तूं स्वर्गांत राहूनच स्वर्गानंद चिरकाल घे ! ''

**टीपः**–प्लँचेटवर त्या वेळीं जर कोणी परलोकीं गेलेल्या केशवरावांचे बोल लिहून मागविले असते तर खास वरील संवादच वाचावयास मिळाला असता, असें लेख-काच्या भाविक बुद्धीला वाटतें.

## गुप्त दिव्य संदेश

अपूर्व लाभ अथवा विलक्षण संकट यावयाचें असल्यास त्याची सूचना ईश्वरा-कडून आगाऊ मिळत असते असें म्हणतात. मात्र त्या सूचनेचें प्रकार निरनिराळे असतात.

ईश्वराकडून येणाऱ्या सांकेतिक संदेशाचें भावी फल फक्त ईश्वराप्रत पोंचलेल्या महात्म्यांच्याच ताबडतोब लक्ष्यांत येतें.

बालगंधर्वांना अज्ञातवास कांहीं काळ सोसावा लागणार तेव्हां सर्व वैभव पराधीन होणार,त्या प्रसंगांत त्यांनीं काय करावें वगैरे सर्व गोष्टींचा ईश्वरी सांकेतिक गुप्त दिव्य संदेश त्यांना आगाऊ येऊन पोंहोंचला होता.

बालगंधर्वांनीं ज्या वेळीं द्रौपदी नाटक रंगभूमिवर आणलें त्या वेळीं त्या नाट-कांत मौल्यवान् वस्त्रालंकाराचा व मोठमोठ्या सीनसीनरींचा गंधर्व मंडळीच्या रंगभूमिवर कळसच झाला होता. पण त्या द्रौपदीचें सर्व वैभव पराधीन झालेलें द्रौपदी नाटकांत द्रौपदीला–नव्हे, त्याबरोबर द्रौपदीची भूमिका घेणाऱ्या बाल-गंधर्वांनाही–स्पष्ट दिसून आलें. हा पहिला संदेश 'बालगंधर्वा, हें तुझें सर्व वैभव यापुढें असेंच पराधीन होणार असें सुचवितो.

'द्रौपदीला वैभव गेल्यावर जसा अज्ञातवास सोसावा लागला तसा तुलाही कांहीं काल अज्ञातवास सोसावा लागेल' असें दृश्य ईश्वरी संदेशानें उभें केलें. धृतराष्ट्रानें 'मुली, वर माग,' असें म्हणताच द्रौपदीनें कोणता वर मागितला तर, पांडवाला दास्यांतून मुक्त करावें ! या संदेशानें काय सुचविलें ? हेंच कीं, जरी तुझें वैभव पराधीन झालें, तरी तूं कोणाचा दास होणार नाहींस. फक्त अज्ञातवासा-चेच तला कष्ट सोसावे लागतील. धृतराष्ट्रानें द्रौपदीला 'तूं आपलें वैभव परत

मागून घे. मी वर देतों ' असें सांगितल्यावर द्रौपदी काय म्हणते ? " महाराज, क्षत्रियांनीं वैभव मागायचें नसतें, तें पराक्रमानें मिळवायचें असतें. "

या संदेशानें बालगंधर्वांना काय सुचविलें ? कीं, तुझें गेलेलें वैभव दया दाखवून कोणीं परत दिलें तर तसें परत घेऊं नकोस. तूं आपल्या पराक्रमानेंच तें परत मिळव. त्याच नाटकांत शेवटच्या प्रवेशांत भीम जेव्हां संतापतो त्या वेळीं द्रौपदी काय म्हणते ? महाराज, दैवबलानं आलेलीं संकटं शांतपणें सोसणं हेंच शौर्य आहे. या संदेशानें काय सुचविलें ? कीं पुढें येणाऱ्या संकटांत कोणावर संतापूं नकोस. आलेलें संकट शांतपणें सोसणें हेंच शौर्य आह.

द्रौपदी नाटक रंगभूमीवर येईपर्यंत बालगंधर्व पूण स्वतंत्र होते. नंतर त्यांचे स्वातंत्र्य, वैभव व गंधर्वमंडळी सुमारें सहा ( ६ ) वर्षे पराधीन होती.

पहिल्या संदेशाप्रमाणें बालगंधर्वांचे वैभव पराधीन झालें. दुसऱ्या संदेशाप्रमाणें, ते कोणाचेही दास न होतां बराच कालपर्यंत फक्त अज्ञातवासांतच राहिले. तिसऱ्या संदेशाप्रमाणें, लोकांकडून मिळणारी द्रव्याची मदत घेऊन त्यांनीं आपलें वैभव परत मिळविलें नाहीं तर, स्वपराक्रमानेंच सर्व कर्ज फेडून त्यांनीं आपलें वैभव परत मिळविलें. चौथ्या संदेशाप्रमाणें आलेल्या संकटांत ते ६ वर्षे कोणावरही संतापले नाहींत, तर ते संकट शांतपणें त्यांनीं सोसून आपले सात्विक शौर्य दाखवलें. सांकातक संदेश ज्यानें पाठविला त्यानें सुबुद्धि देऊन प्रबळ संकटांतून बालगंधर्वांना निभावून नेलें व मुक्त केलें आणि पुन्हा गंधर्व मंडळीच्या मालकाचें पूर्ण स्वातंत्र्य बालगंधर्वांना लाभलें व गंधर्वमंडळीचें वार्षिक उत्पन्न पूर्वीपेक्षां दिडी-दुपटीनें वाढलें ! प्रतिवर्षी दीड लाखाहून अधिक रुपये गंधर्वमंडळीस मिळूं लागले !

## तें नाटक कीं हें नाटक

गंधर्व नाटक मंडळी सुरू झाल्यापासून सुमारें नटवर्य बोडस ६ वर्षे गंधर्व कंपनीचे भागीदार होते. परंतु सहा वर्षांनंतर त्यांनीं कंपनी सोडली. बोडसांनीं कंपनी सोडण्यास काय कारणें घडलीं असतील ती त्यांनाच माहित! त्यांचा उहापोह करण्यांत कांहींच मौज नाहीं. परंतु गंधर्व मंडळी सोडतांना त्यांना २७००० रुपये रोख व गंधर्व मंडळीचे भागीदारीबद्दल वेळोवेळीं उचललेले २५००० रुपये मिळून ५२००० बावन हजार रुपये मिळाले. हा आंकडा संदेश वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेला वाचकांस स्मरत असेलच.

बालगंधर्वांचे व बोडसांचें प्रत्यक्ष भांडण असें झालें नाहीं. कांहीं बाबतींत एकमेकांचीं मतें जुळणें अशक्य झालें, हें मात्र खास.

गंधर्व मंडळी सोडल्यावर नटवर्य बोडस इंदुरमध्यें नवीन स्थापन झालेल्या यशवंत संगीत मंडळीमध्यें डायरेक्टरचे हुद्यावर गेले. नंतर एक वर्षानें ते यशवंत कंपनी सोडून गेले. यशवंत मंडळी सोडल्यानंतर गंधर्व मंडळीचे हितचिंतक अशा कांहीं थोर गृहस्थांनीं त्यांना गंधर्व मंडळींत सामील होण्याबद्दल आग्रह केला. त्यांचे आग्रहास मान देऊन गंधर्व मंडळींत एक वर्ष काम करून प्रकृतीचे अस्वस्थतेमुळें सांगली येथे स्वगृहीं बोडस गेले. पुन्हा प्रकृती सुधारल्यावर ललित-कलादर्शमंडळींत मानापमान नाटकांतील लक्ष्मीधराची व संशयकल्लोळ नाटकांतील फाल्गुनरावाची भूमिका त्यांनीं ५०० रुपये घेऊन फक्त एकदाच करण्याचें पत्करलें! फाल्गुनराव व लक्ष्मीधर भूमिकेवर प्रत्येक वेळीं २५० रुपये घेण्याचा क्रम सुरू करून सुमारें १०००० रुपये बोडसांनीं मिळाविलें. यशवंतमध्यें बोडस असतांना त्यांना दरमहा ३०० रुपये मिळत असत व कंपनीस फायदा उरल्यास त्याचा भाग मिळणार होता, असें ऐकण्यांत आहे. एका नाइटचे २५० रुपये घेण्याची बोडसांची स्कीम यशस्वी झाली. गंधर्व कंपनी त्यांना ३०० रुपये दरमहा पगार देऊं लागली. त्याप्रमाणें एक वर्षाचा पगार त्यांना मिळाला. परंतु त्यापेक्षां जास्त पगार मिळण्याचा त्यांचेजवळ कांहीं आधार होता. त्या आधारें त्यांनीं २१०० रुपयांचा दावा गंधर्व मंडळीवर आणला. हा दावा चालू असतांना ललितकला मंडळींत २५० रुपये नाईटचे घेऊन एके दिवशीं माना-पमान नाटकांत काम करण्यास बोडस मुंबईस आले होते. त्या खेळास आमचे बालगंधर्वही सहज आले होते. लक्ष्मीधराची भूमिका श्रीनटवर्य बोडस करीत असल्याचा तिसऱ्या अंकांतील एक प्रवेश चालू होता. तो प्रवेश संपल्यावर बालगंधर्व कपडेपटांत गेले व गणपतराव बोडस कोठें आहेत असें त्यांनीं विचारलें. ललितकला ना. मंडळीचे चालकांनीं बोडसांना हाक मारली. गणपतराव बोडस आले. बालगंधर्व व बोडस यांची नजरानजर होताच बालगंधर्व एकदम कडकडून सप्रेम भेटल. बोडसांना जवळच उभे असलेलें श्री. गणपतरावही आनंदानें भेटले. नाटककर्ते श्री. कमतनूरकर यांनी हा प्रकार पाहिला आणि आश्चर्यातिरेकानें हंसून त्यांनीं खालील उद्गार काढले, "अहो, तुम्ही हें काय करतां! हायकोर्टांत दावे लावून तिकडे भांडतां आणि येथें थिएटरांत एकमेकांना सप्रेम कडकडून मिठी मारून भेटतां, त्याचा अर्थ काय? आपले हायकोर्टांत चाललेले भांडणाचे ते नाटक! कां आतां प्रेमानें एकमेकांना कडकडून भेटतां हें नाटक! मौजच मौज आहे बुवा उभय नटवर्यांची!"

# देवघरांत बाण कसा आला ?

## फाटाफुटीच्या वेळची गुप्त गोष्ट !

बालगंधर्व, टेंबे, बोडस, वगैरे मंडळींनीं गंधर्व मंडळी स्थापन करण्याचे वेळीं किर्लोस्कर मंडळींतील जुन्या सर्व मंडळीस गंधर्व मंडळींत येण्याविषयीं सप्रेम आमंत्रण दिलें,त्याप्रमाणें कांहीं मंडळी एकएक महिन्याच्या योग्य नोटीसा देऊन गंधर्व मंडळीस जाऊन मिळाली व कांहीं मंडळी जुन्या किर्लोस्कर मंडळीचा अभिमान धरून तेथेंच राहिली. बालगंधर्वांनीं प्रत्यक्ष कोणासच आमंत्रण दिलें नव्हतें, असें ऐकण्यांत आहे. लेखकाला नटवर्य बोडस यांनीं गंधर्व मंडळींत येण्याविषयीं सप्रेम आमंत्रण दिलें होतें.

किर्लोस्कर मंडळींतील जुन्या सर्व मंडळीस आमंत्रण देण्याचें मुख्य कारण- असें कोणीं असें म्हणू नये कीं आम्हांला सोडून गेले. दुसरें, किर्लोस्कर मंडळी सुरू असावी असाही मुख्य हेतु बालगंधर्व वगैरे मंडळींचा होता. म्हणून किर्लो-स्कर मंडळींत त्या वेळीं बहुतेक सर्व मंडळीचा डबल संच होता. डबल संचापैकीं कांहीं जुन्या मंडळींना गंधर्व मंडळींत बोलावणें होतें. त्या वेळीं एक मौज झाली. गंधर्व मंडळींत कै० अण्णासाहेब यांची तसबीर हॉलमध्यें प्रतिदिवशीं पूजा करण्याकरितां एका गादीवर लोडाला टेकून मोठ्या समारंभानें सुमुहूर्तानें ठेवण्यांत आली. किर्लोस्कर मंडळीच्या परंपरेस अनसरून झालें तें ठीक झालें. परंतु किर्लो-स्कर मंडळीप्रमाणें गंधर्व मंडळींच्या देवघरांत एखादा प्रासादिक बाण प्रतिदिनीं पूजनाकरितां कसा मिळेल ? हा प्रश्न बालगंधर्व वगैरे मंडळींच्या डोळ्यासमोर उभा राहिला. तेव्हां कोणीशी एक युक्ती काढली ती अशीः—किर्लोस्कर मंडळीच्या देवघरांत ज्या प्रासादिक बाणाची पूजा नित्य सतत २५ वर्षे होत आहे त्याच बाणाचे शेजारीं कृष्णाप्पाचा कुणी एका साधुनें दिलेला एक छोटा 'बाण' आहे. परिसाच्या संघानें लोहा कांचनता येतें ॥ या कव्युक्तिप्रमाणें कृष्णाप्पाच्या मालकीच्या त्या बाणांत पूर्ण प्रासादिकपणा उतरला आहे. तेव्हां तो 'बाण' गंधर्व-मंडळीच्या देवघरांत पाहिजेच ! म्हणजे सर्व कांहीं किर्लोस्कर मंडळीचें पुण्य आपण संपादन केल्याचें श्रेय लाभणार आहे. या भाविकपणाच्या समजुतीनें त्या वेळीं गंधर्वमंडळीच्या चालकांस पूर्ण पछाडलें पण तो बाण उघडउघड मागून मिळणार नाहीं अशी सर्वांची खात्री होतीच. एके दिवशीं नटवर्य गणपतराव बोडसांचे मातोश्रीस रात्रीं सुमारें दहा वाजतां सुमुहुर्त साधून कृष्णाप्पा पुजारी यांचेकडून "बाण" मागून घेऊन येण्यास सांगितले. कृष्णाप्पा पुजारी यांनींही स्वसंतोषानें तो "बाण" दिला. परंतु त्या बाणाच्या रूपानें किर्लोस्कर मंडळीच्या पुण्याईचा ओघच एक प्रकारें गंधर्वमंडळींत जातो आहे, असें किर्लोस्कराभिमानी पठडीस वाटलें, तर तो "बाण" किर्लोस्कर मंडळीच्या देवघराबाहेर जाणें अशक्य होईल असें वाटल्यावरून तो "बाण" त्यावेळीं फारच संभाळून, सावधपणें व अगदींच गुप्तपणें किर्लोस्कर

मंडळीच्या देवघरांतून गंधर्व मंडळींच्या देवघरांत आणला व देव्हाऱ्यांत अत्यंत भक्तिभावानें ठेवला.

## हे कृष्णाप्पा कोण ?

अण्णासाहेब किर्लोस्कर बेळगांव येथें कमिशनर ऑफिसमध्यें नोकरीस होते. त्या वेळीं त्यांचे पदरीं खाजगी नोकरीस राहिलेला एक बार्शी एथील ब्राम्हणाचा १८।२० वर्षांचा मुलगा. १८८० सालीं किर्लोस्कर मंडळीची स्थापना झाली त्या वेळेपासून कृष्णाप्पा किर्लोस्कर मंडळींत कपडेपटांत कांहीं कामावर जे कामास राहिले ते राहिले. १९०१सालीं भाऊराव परलोकवासी झाल्यानंतर किर्लोस्कर मंडळीचे जुने नोकर म्हणून त्यांना बहुमानाची फक्त पूजा करण्याचे काम असे. नोकरी जोगळेकराचे आमदानींत मिळाली. सुमारें १९१४ पर्यंत कृष्णाप्पा किर्लोस्कर मंडळींत पुजारी होते, म्हणूनच नंतर खुद्द बालगंधर्व वगैरे चालकांच्या निमंत्रणावरून गंधर्व मंडळींत राहिले. गंधर्व मंडळीचें देवघर म्हणजे एखाद्या पवित्र क्षेत्रांतील देउळच आहे असें कृष्णाप्पाच्या पूजेच्या थाटावरूनच व नित्य धार्मिक विधीवरून वाटतें. आतांपर्यंतच्या सुमारें चौतीस वर्षांच्या पुजेमुळें व नामस्मरणामुळें कृष्णाप्पा आतां प्रत्यक्ष देवाप्पाच आहेत,असें बालगंधर्वांना भाविकपणामुळें वाटतें म्हणूनच कीं, काय कृष्णाप्पास " देवाप्पा " या नांवानें बालगंधर्व नेहमीं संबोधतात व नाटकाचे दिवशीं थिएटरमध्यें रंगण्यास जातेवेळीं देवघरांतील देवास नमस्कार केल्याशिवाय तसेंच देवाप्पाचे हातून तीर्थ व अंगारा घेतल्याशिवाय त्याचप्रमाणें देवाप्पास नमस्कार करून त्यांचा शुभ आशीर्वाद घेतल्याशिवाय बालगंधर्व कधींही चुकूनसुद्धां घराबाहेर पाऊल टाकीत नाहींत.

## या दिव्याला–उपमा कोणती शोभेल ?

१९२१–२२ सालच्या सुमारास बालगंधर्वांना सुमारें १॥–२ लाख रुपये कर्ज झालें होतें, ही गोष्ट जगजाहीर आहे. पुढेंपुढें तर अडीचतीन लाखांवर तें कर्ज गेलें. पण बालगंधर्वांनीं गंधर्व मंडळीचे एकटे मालक असतांना सुमारें ६ वर्षांत व्याजासहित तें सर्व कर्ज फेडून टाकलें. कर्जफेडीचे वेळीं गंधर्व कंपनीचा दरबारी थाट जशाचा तसाच होता. देवलक्लबातर्फे सांगली येथें बालगंधर्वांचा सन्मान सुमारें ५।६ वर्षांपूर्वी ज्या वेळीं झाला, त्या वेळीं सांगलीचे आधिपती यांनीं आपल्या भाषणांत बालगंधर्वांनीं सुमारें २॥–३ लाख रुपये कर्ज फेडून समाजांत आपली पत वाढविली, अशा अर्थाचे प्रशंसोद्गार काढले. १९२१–२२ सालीं सावकार लोकांनीं बालगंधर्वांना कर्जफेडीविषयीं निकड लाविली होती. त्या भयंकर प्रसंगामुळें

गंधर्व कंपनी बुडते की काय असें कांहीं लोकांस वाटूं लागलें होतें. त्या वेळीं मुंबई येथील बालगंधर्वांच्या कांहीं उदार चहात्यांनीं दोन प्रकारें बालगंधर्वांना मदत करण्याची इच्छा दर्शविली. ही गोष्ट प्रत्यक्ष कै० दादासाहेब काटदरे यांच्या मुखानें ऐकली, ती अशी. मुंबईच्या रहिवाशांनीं बालगंधर्वांना मुद्दाम भेटून सांगितलें कीं, " आम्हीं २० मंडळींनीं प्रत्येकीं ५००० रुपये म्हणजे एकंदर एक लाख रुपयें तुम्हांला देण्याकरतां तयार केले आहेत. तरी या देणगीचा तुम्हीं स्वीकार करावा" शिवाय दुसरी एक योजना त्या मंडळींनीं बालगंधर्वांनाकळविली कीं, " आम्हीं मुंबई येथें तुमचे पांच खेळ करवतों व त्या खेळाचे दर २५ रुपायांपासून ५ रुपये पर्यंत आम्हीं ठेवतों; आणि आमच्या मित्र मंडळीकडून सर्व तिकिटें खपवितों. म्हणजे तुम्हांला एक लाख रुपये सहज मिळतील. " बालगंधर्वांना ह्या दोन्ही योजना एका उच्च तत्त्वामुळें आवडल्या नाहींत. दुसऱ्या योजनेबद्दल ते म्हणाले " जबर दर वाढवून लोकांवर बोजा टाकणें अत्यंत पाप आहे. मी स्वकष्टानेंच सर्व कर्ज फेडीन. माझ्या चुकीचें प्रायश्चित्त मीच भोगीन ! " यावरून चारुदत्ता-पेक्षांही बालगंधर्वांच्या मनाचा मोठेपणा अधिक सिद्ध होतो. कारण, चारुदत्तानें स्वतःच्या गृहिणीचें स्त्रीधन म्हणजे रत्नमाला संकटमुक्त होण्याकरतां स्वीकारली होती. पण बालगंधर्वांनीं देणगी स्वीकारली नाहीं. सत्ययुगांतील विश्वामित्राला हरिश्चंद्रानें स्वप्नांत राज्यदान दिलें; पण त्यांनीं तें सत्यसृष्टींत खरें करून दाखविलें. कलियुगांतील बालगंधर्वांच्या मनांत आलें असतें आणि त्यांनीं एक नादारीचा अर्ज कोर्टांत हजर केला असतां, तर सत्यसृष्टींतले सावकारांचे लाखो रुपयांचें कर्ज त्यांनीं अल्पावधींत स्वप्नवत् करून सोडलें असतें.

बालगंधर्वांच्या या दिव्याला राजा श्रीयाळाची उपमा शोभेल असें वाटतें. राजा श्रीयाळानें दुःख गिळून आनंदी वृत्तीनेंच स्वपुत्र अतिथीला अर्पण केला, त्याप्रमाणेंच बालगंधर्वांनीं शांत आणि आनंदी वृत्तीनेंच सावकारांचे स्वाधीन ( स्वतः जन्म दिलेली ) गंधर्व मंडळी केली.

राजा श्रीयाळानें स्वपुत्र अतिथीपायींच गमावला, पण गमावण्याच्या पुण्याईनेंच स्वपुत्र पुन्हां मिळविला. त्याप्रमाणें बालगंधर्वांनीं आपल्या सावकारांपायीं स्वतः जन्म दिलेल्या गंधर्व मंडळीच्या मालकीचें स्वातंत्र्य गमावलें–पण गमावण्याच्या पुण्याईनेंच पुन्हां आपलें स्वातंत्र्य मिळविलें.

**टीप**—गंधर्व मंडळीचे त्या वेळीं एकंदर ७१ सावकार होते म्हणतात. परंतु मे० लाड सॉलिसिटर यांच्या ताब्यांत गंधर्व मंडळी गहाण ठेवून सर्व सावकारांचे कर्ज बालगंधर्वांनीं मे० लाड सॉलिसिटर यांच्या तर्फे नेमलेल्या कै. दादासाहेब काटदरे यांच्या हस्तें व्याजासहित पै न पै फेडून टाकलें.

लाडसाहेबांनीं बालगंधर्वांना ६ वर्षे इतकें उत्तम वागवलें कीं, आपण ऋणको आहोंत याची कल्पना क्षणभरही बालगंधर्वांच्या मनाला शिवूं दिली नाहीं. इतकेंच नव्हे तर, गंधर्व मंडळीच्या रंगभूमीवर ऑर्गन व सारंग्या वगैरे मौल्यवान वाद्यांची साथ व त्याचप्रमाणें भारीभारी पगारांचे कलाकुशल साथिदार ठेवण्याची अनुपम सुधारणा प्रथम या कर्जफेडीच्या काळांतच मोठ्या थाटानें सुरू झाली. या कर्जफेडीच्या काळांत हजारों रुपये किंमतीची भरजरी वस्त्रें गंधर्व-रंगभूमीवर बालगंधर्वांच्या हौशी व सुधारणाप्रिय अशा मनानें जशीं पाहिजे तशीं खरेदी करण्यांत आलीं. या कर्जफेडीच्या दीर्घ काळांत बालगंधर्वांनीं खाजगी खर्चाकरतां दरमहा १०००-१५०० रुपये पर्यंत उचल करावी, असें खुद्द कै. दादासाहेब काटदरे यांच्या मुखानेंच मला कळलें.

## सुवर्णदिन

१९२८ साल बालगंधर्वांच्या आयुष्यांतील अत्यंत अवर्णनीय असें महत्त्वाचें होय! सुमारें तीन लाख रुपये कर्ज व्याजासहित असलेल्या रकमेचा शेवटला हप्ता वऱ्हाड प्रांतांतील उमरावती मुक्कामाहून लाड सॉलिटिसर यांना पाठविला आणि एकाएकी नटवर्य गणपतराव बोडस यांना सांगलीहून व तारेनें बोलावणें केलें. बोडस उमरावतीस आले. लागलीच बालगंधर्वांनीं त्यांना सांगितलें कीं, 'गणपतराव, तुम्ही आतां गंधर्वमंडळींत असावें असें मला वाटतें.' नटवर्य बोडसही सप्रेम अंतःकरणानें "होय" असें म्हणाले. ताबडतोब एक वर्षाचा करार खालील अटीवर झाला. नटवर्य बोडस यांना बालगंधर्व यांच्या खास फायद्यांतून एका वर्षाचें पांच हजार ( ५००० ) रुपये द्यावयाचें! त्या वेळीं कोणी एका मित्रानें बालगंधर्वास प्रश्न केला कीं, 'नटवर्य बोडस गंधर्व मंडळींत नसतांना तुम्ही स्वतःच्या हिंमतीवर सुमारें तीन लाख रुपये फेडलेत! तर मग आतां त्यांना ठेवण्यांत तुमचा हेतु काय?' त्या वेळीं बालगंधर्वांनीं एकच बहुमोल उत्तर दिलें म्हणतात कीं 'नटवर्य बोडस आपले वर्षाचे पांच हजार रुपये तें आपल्या नशीबानें व कर्तबगारीनें मिळवतील. ते गंधर्व मंडळींत आल्यानें निदान वर्षाची पांच हजारांची तरी वाढ होणारच!'

तीन लाख रुपये बालगंधर्वांनीं सावकाराचे फेडणें ही गोष्ट बालगंधर्वांच्याच नव्हे-पण महाराष्ट्रनाट्यकलेच्या इतिहासांत देखील अपूर्वच आहे. शिवाय नोकर नाहीं, मालक नाहीं, परंतु मालकीच्या दर्ज्यांत श्री. बोडसांना गंधर्वमंडळींत ठेऊन घेण्यांत व त्याबद्दल परस्पर श्री. बोडसांनाच पूर्ण मोठेपणा देण्यांत, मनाचा खुलेपणा प्रगट करण्यांत, बालगंधर्वांचें पूर्ण निगर्वी मन कसें आहे, हें सहजच कळून आलें.

## नारायण-आश्रम !

बालगंधर्व म्हणजे एक दिलदार बादशाहा असें कोणीकोणी त्यांना म्हणतात. स्वतःला कपडे करावयाचें ठरलें कीं, कुटुंबांतील सर्वांना सारखे करावयाचे हा विचार त्यांच्या डोळ्यासमोर तात्काळ दत्त म्हणून उभा असावयाचाच! स्वतःला व त्याबरोबर निकटच्या सर्वांना कपडे करा, असें त्यांनीं म्हणावयाचें व लागलींच हजार, दोन हजार, रुपये किंमतीची ऑर्डर ई महमदला अगर तशाच कोणातरी व्यापाऱ्याला मिळावयाचीच ! एकाएका बैठकीला सातशेंसाडेसातशें रुपये किंमतीचें अत्तर सहज विकत घेणारे बालगंधर्व कोणतीही ऑर्डर किरकोळ देतांना कोणास स्वप्नांत देखील दिसले नसल्यास नवल नाहीं ! बालगंधर्व प्रथम किर्लोस्कर संगीत मंडळींतच रंगभूमीवर मोठ्या थाटानें आले! त्यामुळें किर्लोस्कर मंडळींतील जुन्या माणसाबद्दल त्यांना एक प्रकारचा विलक्षण आपलेपणा वाटतो. ही गोष्ट पुष्कळ माणसांना ठाऊक आहे. मिरज संस्थानांतील ड्रॉईंग मास्तर गोविंद लक्ष्मण सोरटी हे एक बालगंधर्वांचे अत्यंत आवडते असे सद्‌गृहस्थ आहेत ! श्रीयुत गोविंदराव सोरटी १८८५ ते १८९० पर्यंत किर्लोस्कर मंडळींत सौभद्र नाटकांत रुक्मिणीची भूमिका करित होते. नंतर ते अभ्यासानें उत्तम पेंटर झाले ! श्री. सोरटी किर्लोस्कर मंडळींतले आहेत व उत्तम कलावंत आहेत, एवढ्याच एका गोष्टीवर त्यांचेवर बालगंधर्वांचे आपलेपणाचे उत्तम प्रकारचें प्रेम बसले. त्यांतून ते उत्तम आर्टिस्ट ! मग काय ? एके दिवशीं असा योग आलाच! कीं, श्रीयुत गोविंदराव यांनीं कै. अण्णासाहेब, भाऊराव, नाटेकर, भास्करबुवा बखले वगैरे सर्व पूज्य विभूतींचीं तैलचित्रें तयार करून बालगंधर्वांची प्रेमभरित ऑर्डर पुरी केली. श्रीयुत गोविंदराव सोरटींनीं बालगंधर्वांच्या मनाप्रमाणें एक तैलचित्र तयार करून आणून द्यावें कीं, बालगंधर्वांनीं ताबडतोब दुसऱ्या तैलचित्राची ऑर्डर द्यावयाचीच ! गोविंदराव सोरटींनीं, भाऊराव, मोरोबा, इ. नटांना प्रत्यक्ष पाहिलें होतें ! म्हणून इतर

पेंटरपेक्षां गोविंदराव सोरटीच प्रत्येक तैलचित्र अगदीं हुबेहूब तयार करूं लागले. या सोरटीच्या गुणाचा व मेहनतीचा फायदा सुमारें ५००० रुपये बालगंधर्वां-च्याकडून त्यांना मिळाला. तेव्हां गोविंदराव सोरटींनीं पुणें येथें "**नारायण आश्रम**" या नांवाचें छोटेंसें बिल्डिंग बांधून त्या पांच हजार रुपयांचें एक कायमचेंच स्मारक करून ठेवलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं! ( बाल-गंधर्वांचें संपूर्ण नांव नारायण श्रीपाद राजहंस आहे म्हणूनच "नारायण आश्रम" हें नांव सोरटींनीं पुणें येथील नवीन बांधलेल्या स्वतःच्या इमा-रतीस दिलें. )

## प्रेमळ अंतःकरणाच्या दोनतीन मौजा !

१९२९ सालीं गणपतराव बोडस, दादासाहेब परचुरे वगैरे मंडळीं पुणें मुक्कामीं गंधर्व मंडळींतील बालगंधर्वांच्या बैठकीच्या रूममध्यें बसलीं होतीं. इतक्यांत एक अत्तरवाला अत्तरें घेऊन आला. अत्तरवाला अत्तराचे नमुने दाखवून म्हणाला 'महाराज! ये अत्तर तीस रुपये तोला! ये दस रुपये तोला! कोनसा बी ल्यो!' इतक्यांत जवळच असलेले बोडस म्हणाले. "देखो, किंमत माफक बोलो. तो तुम्हारी बीक्री इधर आच्छी होगी." तेव्हां मध्येंच बालगंधर्व मोठ्यानें बोलले 'गणपतराव, ही किंमत अगदीं थोडी आहे. माझ्याजवळ अशींच अत्तरें आहेत. पण ऐंशी ऐंशी रुपये तोळा पूर्वीच्या अत्तरवाल्यांनीं माझ्याकडून घेतले. बिचारा किंमत फारच थोडी सांगतो आहे' असें म्हणून त्याच बैठकीला सुमारें साडेसातशें रुपयांचीं अत्तरें त्याच अत्तरवाल्याकडून बालगंधर्वांनीं विकत घेतलीं!

त्याच अत्तरवाल्याकडून एका वर्षांत सुमारें चार हजारांचीं अत्तरें बालगंध-र्वांनीं विकत घेतलीं, इतकेंच नव्हे तर सुमारें २-३ वर्षांत एकंदर दहा हजार रुपयांचीं अत्तरें बालगंधर्वांनीं खरेदी केली, असें ऐकण्यांत आहे!

## बिचारें कुत्रें मरेल वरें मरेल !

१९२९ सालांत देवीची साथ पुण्यांत बरीच होती. गंधर्व मंडळीच्या शेजार-च्याच वाड्यांत मुख्य नट वालावलकर यांचे कुटुंबास देवी आल्या होत्या. त्याच वेळीं गंधर्व मंडळींतील चारपांच कुत्र्यांपैकीं मोत्या नांवाच्या कुत्र्यास देवी उद्भ-वल्या होत्या, असें देवीडॉक्टरचें मत होतें. अर्थात् डॉक्टरच्या सूचनेवरून मोत्या कुत्र्यास दूरच्या दवाखान्यांत ठेवण्याचें ठरलें, असें बालगंधर्वास कळलें. तेव्हां एकदम कळवळून बालगंधर्व म्हणाले 'अरे नका रे! त्या बिचाऱ्या मोत्या

कुत्र्याला दवाखान्यांत दूर नेऊं नका! विचारें कुत्रें मरेल बरें मरेल! तेथें कोण बरें त्याला घरासारखें जपेल? तर मोत्याला घरींच ठेवा आणि डॉक्टरची ट्रीटमेंट अगदीं आपल्या जिव्हाळ्याच्या माणसासारखीं ठेवा म्हणजे झालें!' बालगंधर्वांची आज्ञा होतांच, तशीच व्यवस्था मोत्याची ठेवण्यांत आली व बिचारा मोत्या कुत्रा पूर्ण बरा झाला!

## माकडाच्या पायगुणानें सरोजिनीच्या लग्नाचें जमलें

१९२९ साल—मुक्काम मिरज! दरमहा सुमारें १५ ते २० हजार रुपये गंधर्व मंडळीस प्राप्ति होत होती! ह्या वेळीं नुकतेंच थिएटरमधील एका नोकरानें एक माकड बाळगलें होतें, त्या माकडाबरोबर बालगंधर्व नेहमीं एक प्रकारें मौजेनें खेळत असत! मिरजेचा मुक्काम संपून गंधर्व मंडळी मुद्दाम पुण्यास, गंधर्व-कन्या सरोजिनी इचा विवाह डॉ० वाबळे यांच्याशीं ठरला म्हणून, मोठ्या आनंदानें जाण्यास निघाली! मिरज स्टेशनवर गाडी आली. मंडळीच्या रिझर्व केलेल्या डब्याजवळ बालगंधर्व सहज हिंडत होते! फर्स्ट-क्लास, सेकंड-क्लास व थर्ड-क्लासमध्यें जी जी मंडळीं बसावयाची ती ती मंडळीं होतीं, त्याच डब्यांत मंडळींतील चार, पांच कुत्रींही एका नोकराजवळ होती. परंतु तें माकड कुठें बालगंधर्वांना दिसलें नाहीं. तेव्हां मोठी एखादी गोष्ट चुकल्यासारखे वाटून बालगंधर्व एकदम मोठ्यानें ओरडून व घाबरून एका नोकरास म्हणाले 'अरे ते माकड कुठें आहे?' तें माकड मिरजेसच एका मनुष्यास दिलें, असें नोकर म्हणाला. तेव्हां बालगंधर्व म्हणाले; "अरे, हें काय बरें तुम्ही केलें? अरे, त्याच माकडाच्या पायगुणामुळें आमच्या मुलीचें (सरोजिनीचे) लग्न ठरलें ना? ते कांहीं नाहीं. आत्तांच्या आत्तां टांगा करून गांवांत जा आणि त्या माकडाला घेऊन या!" बालगंधर्वांची आज्ञा होतांच नोकर गांवांतून त्या माकडास घेऊन आला व त्यासहित गंधर्व मंडळीं पुण्यास आली!

## अज्ञातवास—दारुण प्रसंग!

सुमारें तीन लाख रुपये कर्ज फेडण्यास सहा वर्षे लागलीं. कारण मंडळीच्या सुखसोई व गंधर्व मंडळीचा बादशाही थाट किंचितही कमी करावयाचा नाहीं ही बालगंधर्वांची सदिच्छा! व ती पूर्ण करणारे लाड साहेब यांचेसारखे उदार मनाचे गृहस्थ सावकार. मग परमेश्वर तरी कां बरें तेथें उणें पडूं देईल? तरी पण सत्त्व-परीक्षेचें अशा समयीं दारुण प्रसंग नायकांस यावयाचेच! असा जगाचा पूर्व इति-

हास पुढें चालू रहाणारच, हा जणुं ईश्वरी संकेतच! कर्जफेडीच्या सहा वर्षांत गंधर्व मंडळीच्या सर्व वस्तूवर देखरेख व मुखत्यारी ताबा कै० दादा काटदरे यांचें स्वाधीन होता. या अवधींत एके दिवशीं बालगंधर्व यांच्या परवानगीनें स्टेजअधिकाऱ्यांनीं कोण्या एका समारंभाकरितां भरजरी गालिच्या, लोड, बाज्याची पेटी, तबला वगैरे वस्तु चार घटका समारंभ साजरा करण्याकरितां दिल्या होत्या, त्या सर्व वस्तु समारंभ संपल्यावर परत आल्या; तसेंच एके दिवशीं दिवसाचें नाटक चालू असतां कांहीं जरूरीच्या कामाकरितां बालगंधर्व यांच्या परवानगीनें एका मनुष्यानें तिकीटमास्तरकडून दहा रुपये घेतले-वरील दोन्ही गोष्टी साध्या होत्या. परंतु कडक शिस्त चालविणाऱ्या कै० दादा काटदरे यांना आवडल्या नाहींत. दादांनीं सक्त ताकीद त्या त्या नोकरांना दिली कीं, याउपर माझ्या आज्ञेवांचून असें कारभार करूं नका! ही गोष्ट बालगंधर्व यांना समजली, परंतु ते त्याबद्दल चकार शब्द बोलले नाहींत. पूर्ण कर्ज फिटतांच मे० लाड यांनीं बालगंधर्वांचें ताब्यांत परत सर्व कारभार केला. त्या वेळीं दादांना वाटलें कीं, आपल्या त्या वेळच्या कडक शिस्तीबद्दल गंधर्व नोकरीवरून आपल्याला काढून टाकतील. पण तसें झालें नाहीं. उलट बालगंधर्व एकाजवळ म्हणाले: दादांनीं त्या वेळीं तशी कडक शिस्त ठेविली, म्हणूनच सर्व कर्ज फिटलें. बालगंधर्वांनीं दादांना मरेपर्यंत गंधर्व मंडळींतच पेन्शन देऊन सुव्यवस्थित ठेवलें.

वरील गोष्ट खुद्द दादा काटदरे यांच्या मुखानेंच मला ऐकावयास मिळाली.

## खाऊंद्या गरिबांना पैसे

एके दिवशीं दादा काटदरे सांगू लागले. आमच्या नारायणरावांना मी एकदां विचारले. तुम्ही आपल्या अमक्या अमक्या कॅशिअरकडून इतके इतके वेळां इतके रुपये घेतलेत कां? तसेंच, तुम्ही इतके वेळां काल गाडींतून बाहेरून आलात कां? तेव्हां नारायणराव एकदम फारच रागावले व म्हणाले, या प्रश्नाचा अर्थ मला समजला. त्या कॅशिअरनें कदाचित थोडे अधिक पैसे खर्ची घातले असतील-असाच ना तुमचा संशय? आणि थोडे पैसे खाल्ले असतील-असेंच ना? या बाबतींत मला पुन्हा प्रश्न विचारूं नका. खाल्ले असतील तरी खाऊंद्या गरीबांना पैसे! मोठमोठ्यांच्या पदरचे नोकर बिचारे पैसे खात असतात असें आपण ऐकतों! आणि त्या बिचाऱ्यांना त्यामुळें समाधान होत असतें, तर कदाचित तसेंच असेल तर मला त्यांत आनंदच आहे.



कै. त्रिंबकराव साठे.



श्रीयुत शंकर बापुजी मुजुमदार.



श्रीयुत चिंतामण रामचंद्र दिवेकर,
किर्लोस्कर मंडळी–तालीम मास्तर व नट.

## बिचारा उपाशी उठला वाटतें !

संवत्सरांतील एकूणएक एक ' सण ' संस्थानी थाटानें झाले पाहिजेत ! श्रीगणपती उत्सव, दिवाळी, दसरा, शिमगा, श्रावणी सोमवार इत्यादि शुभ प्रसंगीं देवाची पूजा, त्याचप्रमाणें पक्वान्नें,सर्व कांहीं पूर्ण थाटाचें गंधर्वमंडळींत व्हावयाचें. त्यावेळीं नोकरमंडळींखेरीज बाहेरील माणसे जेवणास पुष्कळ असावयाची ! केळीच्या पानावर दोन्ही बाजूस भरगच्च भाज्या, चटण्याकोशींबिऱ्या असावयाच्या, त्याचप्रमाणें भारी भारी किंमतीचे सर्व पदार्थ व्हावयाचे ! अशावेळीं कधीं कधीं पंगत उठल्यावर बालगंधर्व सर्व पंगतींतून पानें पहात पहात हिंडावयाचे व सर्व पात्रांवर खुपच टाकलेलें पाहिलें म्हणजे त्यांच्या मनांस आनंद व्हावयाचा ! आणि जर एखाद्या पानावर कांहीं टाकलेलें दिसले नसलें कीं, ते वाढणारावर रागवावयाचे. 'अरे ! या ठिकाणीं जेवलेल्या माणसांना तुम्ही आग्रह केला नाहीं वाटते ! अरेरे ! बिचारा लाजाळु माणूस अधिक कांहीं मागून न घेतां उपाशी उठला वाटतें ? '

गड्यापासून थेट मालकांपर्यंत एकच थाट जेवणाचा कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांचा असे. त्यांच्या मागें किर्लोस्कर मंडळींत तेंच वळण होतें. तोच किंबहुना सवाईथाट बालगंधर्व यांनीं आपल्या गंधर्व मंडळींत ठेवला आहे.

बोलक्या सिनेमामुळें नाट्यसृष्टी जर कांहीं काल थांबली तर पुढील पिढीला वरील इतिहास नुसता मनोरंजक न वाटता खरोखरींच कौतुकास्पद वाटल्यावांचून राहणार नाहीं !

## खरें समाधान यांतच मला वाटतें.

१९२८ डिसेंबरमध्यें नटवर्य बोडस गंधर्वमंडळींत बालगंधर्वांच्या खास बोलावण्यावरून आले पण तेव्हांपासून गंधर्व मंडळीच्या ' हॉल ' मधील मालकीच्या गादीवर तालीम चालू असतांना नेहमीं गणपतराव बोडस बसलेले दिसावयाचे व बालगंधर्व हॉलमधील बैठकीकरता अंथरलेल्या मोठ्या सतरंजीवर इतर नटाप्रमाणें नेहमीं बसलेले दिसत असत. ते पाहून कोणी एकानें प्रश्न केला कीं, हें काय ? तुम्ही मालक ना ? मग असे का ? गणपतराव 'गादीवर ' आणि तुम्ही इतरांप्रमाणें नुसत्या बैठकीवर कां बसतां ?

"ते मोठे आहेत. तेव्हां खरें समाधान यांतच मला वाटतें !" असें उत्तर शांत मनानें व आनंदानें बालगंधर्वांनीं दिलें !

## एक भयंकर संकट !

नाटक संपलें, प्रेक्षक घरोघर गेले, सुमारें एक तासानें म्हणजे रात्रौ ३ वाजतां काळोख्या रात्रीं रंग पुसून पुणें येथील किर्लोस्कर थिएटरचे बाहेर बाल गंधर्व बाहेर एकटेच आले. रस्त्यावर एकच टांगा उभा होता, त्यांत बालगंधर्व बसले. टांग्या-वाल्यानें टांगा भलत्याच रस्त्याला भरधांव फेकला. "अरे, आमचें घर या बाजूला नाहीं" असें बालगंधर्व मोठमोठ्यानें ओरडून सांगत होते तरी टांगवाला आपल्या घोड्याला सारखे जोरजोराने चाबुक मारून घोडा भरधाव पळवीत होता. तेव्हां अर्थातच बालगंधर्व फारच घाबरले आणि त्यांनीं धावत्या टांग्यांतून एक-दम रस्त्यावर उडी टाकली व तीव्र वेगानें पळत पळत गंधर्वमंडळीचें घर गाठलें व घरीं जागे असलेल्या मंडळीस घडलेली भयंकर संकटाची हकीगत सांगितली. त्यावेळीं त्यांच्या हातांत एक सुंदर मौल्यवान सोन्याचें रिस्टवॉच होते, व बोटांत एक हिऱ्याची मौल्यवान आंगठी होती. नटसम्राट बालगंधर्वांचे वरील आयुष्यांतील एक भयंकर संकट परमेश्वरकृपेनें टळलें, असें मंडळींना वाटलें. तेव्हां पासून बालगंधर्वांच्या बरोबर बहुधा तळेगांवकर नांवाचे गृहस्थ असतात, असें एके दिवशीं बोलतां बोलतां वरील हकीगत सांगत असतां दादा काटदरे म्हणाले.

## बालगंधर्वांची रंगभूमि

महाराष्ट्रांतील सर्व नाटकमंडळ्यांपेक्षां आपल्या रंगभूमिवर प्रत्येक गोष्ट श्रेष्ठ दिसावी, ही महत्त्वाकांक्षा बालगंधर्वांची जबर ! गंधर्व मंडळीचें नवें नाटक रंग-भूमीवर यावयाचें म्हणजे त्यांतील प्रत्येक गोष्ट नवी पाहिजेच ! भरजरी अंगरखे, भरजरी शालू, भरजरी गालीचे, भरजरी लोड, वगैरे सर्व कांहीं खऱ्या जरीचे व मौल्यवान पाहिजेत, या दृष्टीनें खरेदी करावयाची. द्रौपदी नाटकांतील भरजरी गालिचा १५००० रुपये किंमतीचा आहे असें म्हणतात. त्याचप्रमाणें पडदे, सीन, सर्व कांहीं नव्या नाटकांत नवीनच पाहिजेत ! गडकरीस्मृतिदिनप्रसंगीं बाल-गंधर्व अध्यक्ष होते. त्या वेळीं बोलतांना बालगंधर्व म्हणाले "आम्हांला प्रत्येक नवीन नाटक रंगभूमिवर आणावयाचें म्हणजे बारा तेरा हजार रुपये खर्च येतो." द्रौपदी, स्वयंवर, नंदकुमार, इ० पौराणिक नाटकांना तर दीडदिडपटीनें खर्च केला आहे, असें खुद्द दादा काटदरेच म्हणाले. प्रेक्षकही दिपून जातात, व सर्वतो-मुखी धन्य धन्य बालगंधर्व, धन्य त्यांची अवाढव्य खर्च करण्याची छाती, असेंच जिकडे तिकडे ऐकावयास मिळतें. ऑर्गन व सारंग्याची साथ मराठी रंगभूमीवर

प्रथम बालगंधर्वांनींच सुरू केली. साथीची मुख्य ऑर्गन २५०० रुपये किंमतीची पाहिजे. साथीदारही दरमहा १००—१०० रुपयांचे डबल ट्रिबल व गुणांत सर्वश्रेष्ठ असे बालगंधर्वांनीच ठेवावेत. साथीदारांची मिजास बालगंधर्वांनींच अत्यंत खर्च सोसून परंतु कौतुकानें ठेवावी. १००–१००–१५०–१५० दरमहाच्या नटांना भर पगाराची सहासहा महिनें, वर्ष वर्ष रजा बालगंधर्वांनींच, आजारीपणामुळें का होईना पण द्यावी. नटवर्य बोडसारखे नट दरमहा५००–५००रुपये देऊन बालगंधर्वांनींच आपली रंगभूमि शोभविण्याकरतां ठेवावेत. संत कान्हुपात्रा नाटकांतील श्रीविठ्ठलाच्या देवळाचा श्रीक्षेत्र पंढरपुरासारखा हुबेहुब सीन करण्याकरतां सातसाडेसात हजार रुपये बालगंधर्वांनींच खर्च करावेत. केवढी त्यांची छाती; प्रो. विनायकराव पटवर्धन, मास्तर कृष्णराव, रानडे, वालवलकर, भांडारकर, इ० गुणसंपन्न नटांना आपल्या रंगभूमीवरून वर्षोनवर्षे हलूं न देण्याचें चातुर्य, गुणग्राहकता, प्रेमळपणा इ० गुण बालगंधर्वांच्या ठिकाणींच प्रामुख्यानें वास करींत आहेत, असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. विधिलिखित नाटकांतील पुरुषपार्टांचे खास रेशमी शर्ट प्रत्येकीं २५–२५ रुपयांचा पाहून एकानें बालगंधर्वांना प्रश्न केला, कीं, बंद कॉलरच्या शेरवानीच्या आतले शर्ट इतके भारी कशाला हवेत ! त्यावर बालगंधर्वांनीं उत्तर दिलें, "अहो खऱ्या भरजरीच्या हजारो रुपये किंमतीच्या शेरवानीआंत—मांजरपाटाचा का शर्ट आमच्या नटांना घालावयास द्यावयाचा !"

बालगंधर्वांच्या गंधर्व मंडळीची रंगभूमी ज्यांनीं ज्यांनीं पाहिली, त्यांना वरील सर्व गोष्टी तंतोतंत पटणारच !

## टिकाकारांच्या टीकेचें सार !

बालगंधर्वांच्या निरनिराळ्या भूमिका संगीतांत व अभिनयांत किती उत्कृष्ट वठतात, अथवा दोन्हीही कलेंत सर्व भूमिका किती उच्च स्थानास जाऊन पोंचल्या आहेत, याचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे व या गोष्टींचें वर्णन करावयाची जरूरही नाहीं. कारण धनिक व रसिक प्रेक्षकांच्या दरखेळास होणाऱ्या चिकार गर्दीवरूनच सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

कोणी लेखक म्हणतो, बालगंधर्वांची शोकरसाची सिंधूची भूमिका कलेच्या दृष्टीनें अत्युच्च शिखरावर जाऊन पोंचलों आहे. कोणी लेखक म्हणतोः शृंगाररसाचें काम बालगंधर्वांचें फारच उत्कृष्ट होतें. सारांश, सर्व लेखकांच बालगंधर्वांच्या सर्व भूमिकेसंबधानें सर्व लेख वाचले व त्यांतला एक एक चांगुलपणा एके

ठिकाणीं जमवला कीं, सर्वच भूमिका गायनांत, अभिनयांत व नैसर्गिक रूपसुंद-रतेमुळें व मधुर आवाजामुळें उत्तम होतात असें ठरतें.

## शेवटीं श्रेष्ठ कोण ?

१९२१ ते १९३० पर्यंत गंधर्व मंडळीस वार्षिक उत्पन्न दीड पावणेदोन लाख रुपये होतात, असें एका मासिकांत प्रसिद्ध झालें होतें. त्यावरून कित्येक प्रेक्षक म्हणतात, भपकेदार व उच्च सीनसीनरीमुळें इतकें उत्पन्न होतें ! कोणी म्हणतात, भरजरी व खऱ्या अशा मौल्यवान वस्त्रांना लोक भुलतात. कोणी म्हणतात बाल-गंधर्वांचे नाटककारच श्रेष्ठ व कसलेले आहेत. कोणी म्हणतात महाराष्ट्रांतलि सुप्रसिद्ध गायक व सुप्रसिद्ध अभिनयकुशल असे नट, डबल, ट्रिबल गंधर्व रंगभूमीवर आहेत ! कोणी म्हणतात इतर रंगभूमीपेक्षां लाईटच अधिक पावरचा असतो ! कोणी म्हणतात, भारी भारी किंमतीच्या ऑर्गन, सारंग्या, तबले इ. वाद्यें असून साथ करणारेच नामांकित विद्वान आहेत !

वरील सर्व गोष्टी अक्षरशः खऱ्या आहेत. परंतु १९२९ सालीं उमरावतीहून बालगंधर्व मुंबईस गेले होते, त्यांची ज्येष्ठ कन्या त्या वेळीं दोषी तापानें अत्यवस्थ होती. ( नंतर ती त्याच तापांत स्वर्गवासी झाली. ) त्यांच्या पश्चात् सुमारें आठ नाटकें झाली, त्या सर्व नाटकांस सुमारें २४०० रुपये झाले. म्हणजे प्रत्येक खेळास ३०० रुपये अॅव्हरेज पडला. परंतु बालगंधर्व ज्या दिवशीं उमरावतीस आले त्या नवव्या नाटकांस सुमारें २३०० रुपये झाले म्हणतात ! यावरून बाल-गंधर्वांचें गाणें, अभिनय व रूपसौंदर्य लोकांना अधिक प्रिय होत असावें असें अनुमान कोणी काढतात, तर कोणी म्हणतात बालगंधर्वांची पूर्वपुण्याई व परमे-श्वराची कृपाच सर्वांत श्रेष्ठ आहे हेंच खरें !

## सवाई–थाट !

बालगंधर्वांनीं गंधर्व मंडळीचा थाट कांहींकांहीं बाबतींत किर्लोस्कर मंडळीच्या सवाईनें ठेवला असें दिसून येतें. नाटकाच्या दिवशीं नटांना दुध, चहा, कॉफी, सोडा, लेमन, कंपनीच्या खर्चानें मिळतें. दररोजचे जेवण सरदारी थाटाचें असून जेवणानंतर सर्व मंडळीस, पान, सुपारी, तंबाखु इ. वस्तु कंपनीच्या खर्चानेंच मिळतात प्रवासाचा थाट औरच ! बालगंधर्व फॅमिली फर्स्ट क्लासमध्यें तर पन्नास रुपयें पगारावरील सर्व नोकर सेंकड क्लासमध्यें. बाकी सर्व थर्डक्लासमध्यें. प्रवासाचे वेळीं फराळ म्हणजे जणुं दिवाळीच ! सुमारें १०० छोटीं ताटें, वाट्या

व फुलपात्रीं प्रवासाचे वेळीं स्पेशल. सर्व नोकरमंडळींचे सोयीसाठीं, मुंबई ते गोवा स्पेशल बोट गंधर्वमंडळानें गंधवमंडळीकरितां केली होती. ही १९३१ सालची गोष्ट. अलीकडे कित्येक वर्षे दरमहा श्रीसत्यनारायणाच्या पुजेचा थाट व पक्वान्नांचें जेवण प्रत्येक गांवचे गंधर्वांचे इष्टमित्र सुद्धां सांगू शकतील ! यवतमाळहून भाज्या-खरेदीस उमरावतीस नेहमीं बाजार मास्तर जायचा. नाटकाचे दिवशीं शेकडोंशे लोक चहा पिऊन तृप्त व्हावयाचे ! उन्हाळ्यांत हजारों प्रेक्षकांकरितां अनेक माठ ठेऊन थंड पाणी, गुजराथी पाणीवाले स्पेशल ठेवणें, वगैरे सर्वच थाट सवाई खरा !

किर्लोस्कर मंडळींत देखील दररोजचें जेवण गड्यापासून मालकापर्यंत गंधर्व-मंडळींप्रमाणें होतेंच ! पुष्कळ वर्षे म्हणजे सुमारें १९१० पर्यंत प्रवासाचे वेळी सेकंड क्लास होता.

## चालताबोलता कॅटलाग !

सुमारें १९०७ सालीं जर्मनीच्या ‘ बेका ’ नांवाच्या ग्रामोफोन कंपनीनें प्रथम बालगंधर्वांची सौभद्र, मूकनायक, शांकुतल, इ. नाटकांतील पदें घेतलीं. त्यापूर्वी एकाही नटाचीं गाणीं ग्रामोफोनमध्यें नव्हतीं म्हणतात. त्या वेळीं ग्रामोफोन गान-प्रिय रसिकानें घेतला कीं, बालगंधर्वांचें गाणें असलेल्या प्लेटी पाहिजेतच—अशी जबर आवड लोकांमध्यें पसरली होती. बालगंधर्वांचें गाणें कोठें विकत मिळतें ? तर म्हणे ‘ बेका ’ नांवाच्या ग्रामोफोन कंपनींत ! त्या वेळीं तरी बेका कंपनीचा चालताबोलता कॅटलॉग म्हणजे ‘ बालगंधर्व ’ जणुं अशी म्हण पडली होती म्हणतात. मुंबईच्या कापडबाजारांत फॅशनेबल भरजरी अगर रेशमी अन्य प्रकारचा नवा नवा माल आला कीं, कांहीं व्यापाऱ्यांची खात्री कीं, बालगंधर्व या उंची व नव्या नव्या डिझाईनचें आपले पहिलें गिऱ्हाईक बरें. तो मौल्यवान कपडा बालगंधर्वांच्या अंगावर उच्च उच्च भूमिकेच्या वेळीं गंधर्व रंगभूमीवर, बड्या, बड्या प्रेक्षकांनीं पाहिला कीं, बड्या बड्या स्त्रियांच्याकडून त्या मौल्यवान वस्त्रांना मागणी त्या व्यापाऱ्याचें तें दुकान हुडकीत यावयाचीच ! अशी बोलवा ऐकण्यांत येते कीं बालगंधर्वांचे फोटो नाहींत असें रसिकांचें महाराष्ट्रांत घर नाहीं, असें श्री. कमतनुरकर २४ व्या नाट्यसमेलनप्रसंगीं आपल्या भाषणांत बोलले ! वगैरे सर्व गोष्टीवरून पहातां बालगंधर्व म्हणजे एक चालता बोलता ‘ कॅटलाग ’च आहे असे पुष्कळ लोकांच्या तोंडून ऐकावयास मिळतें तें खरें वाटतें !

# मुलांच्या नाटकमंडळ्या असूं नयेत पण असाव्या.

बालगंधर्व अध्यक्षपदावरून पुणें मुक्कामीं (१९२९ साली) बोलले, कीं मुलांच्या नाटकमंडळ्या असूं नयेत ! किर्लोस्कर मंडळींत ज्या वेळीं मी मूल म्हणून होतों त्यावेळचीं बहुतेक मुलें तरुण व प्रौढ वयात उत्तम स्थितींत मला दिसलीं, त्याचें कारण किर्लोस्कर मंडळींत त्यावेळीं मुलांनीं कांहींतरी विशेष करावें अशा तऱ्हेचें शिक्षण व व्यवस्था त्या वेळच्या चालकांनीं आपलेपणानें ठेवली होती. बालगंधर्वांचें बोलणें त्या वेळीं मुलांच्या नाटकमंडळ्यांना नावडतें झाल्यास नवल नाहीं. पण अरुणोदय सं. मंडळीची व्यवस्था प्रत्यक्ष पाहून बालगंधर्व हुबळी येथें भाषण करतांना जाहीरपणें बोलले कीं, तें माझें मत बदललें !यावरून एकच ठरतें कीं, बालगंधर्वांच्या मनाला पटलें कीं ते आपलें मत परत घेतात ! तसें करण्यांत अपमान मानीत नाहींत ! किर्लोस्कर मंडळींतील एके काळचीं मुले म्हणजेच अलिकडचे नटवर्य बोडस, नटवर्य गोरे, गुंडोपंत वालावलकर (म्युझीक डायरेक्टर कोल्हापूर सिनेटोन) गणपतबुवा पुरोहित (मुंबई) राजारामबापू पुरोहित, यशवंत सं. मंडळींतील नट व हल्लीं प्र. फि. कंपनींतलि ऑर्गन मास्तर के॰ बाबुराव गाडे किर्लोस्कर व सिनेमांतील प्रसिद्ध नट, आठवले, मास्टर दिनानाथ, व कोल्हापुरे, बलबंत कंपनीचे मालक ( कोल्हापुरे हल्लीं किर्लोस्कर मं. चे मालक आहेत ) के॰ रघुनाथराव गोखले ( सामाजिक मं. मालक ) श्री. लोंढे ग. ना. मं. मुख्य नट प्रस्तुत लेखक, अन्तोबा करंदीकर य. सं. मं. अशी किती तरी त्या वेळचीं मुलें हल्लीं नांवें सांगण्यासारखीं बालगंधर्वांच्या डोळ्यासमोर भाषण करतांना उभी राहिलीं असतील. सारांश, मुलांनीं मोठेपणीं शक्य तेवढें विशेष कांहींतरी नांव निघण्यासारखें करावें व लग्नें वगैरे करून उत्तम आयुष्य घालवावें, हीच बालगंधर्वांची नाटक मंडळीच्या मुलांच्या बद्दल सदिच्छा असणार !

# ऐकावें तें औरच !

गंधर्व मंडळींतील नट मास्तर कृष्णराव एकदां आजारी होते. सुमारें ६ महिने ते माथेरान येथें हवा पालटण्यास गेले होते त्यावेळीं भरपगारी त्यांना रजा मिळाली होती. पंढरपूरकरबुवा असेच कित्येक महिने भरपगारी रजेवर हवा पालटण्यास गेले होते. पंढरपुरकरबुवांना तर शेवटच्या त्यांच्या वेडाच्या आजारांत १५० रुपये त्यांचा दरमहा कांहीं महिने म्हणजे त्यांच्या अंतकालापर्यंत चालूच होता म्हणे !

थिटे पेन्टरना तर वाईस दरमहा १०० रुपये ते खोकल्यांतून बरें होईपर्यंत कांहीं महिने मनिआर्डरीनें काम चालू नसतां मिळत होते. मे० महबुबखान गुरूंना तर कित्येक वर्षे बालगंधर्वांनीं ठेऊन घेतलेले आहे; पण त्यांना ते मागतील तितके रुपये त्यांना वाटेल तेव्हां देतात हेंही एक अपूर्वच ! एकदां एक नाचमास्तर दरमहा १०० रुपये ठरवून ठेवला त्याचेबरोबर दोन माणसें होतीं. त्याला कोठीतून वाटेल त्या वस्तू घेऊन इच्छेप्रमाणें करून खाण्यास परवानगी. मौज ही कीं, बालगंधर्व स्वतः मेनकेच्या भूमीकेकरतां वयाच्या ४२ व्या वर्षी नाच शिकणार होते. परंतु ज्या दिवशीं शिकण्यास मुहूर्त १५ मिनिटें केला तेवढांच वेळ सुमार ७–८ महिन्यांत बालगंधर्व स्वतः शिकले ! पण त्या नाचमास्तरला प्रवासाचे वेळीं सेकंडक्लास व त्याचीं दोन माणसें थर्ड क्लासमध्यें बसत असत. शिवाय दरमहा १०० रुपये त्यास सतत ७–८ महिने मिळत होतेच ! अशा किती तरी गोष्टी ! लिहाव्या तितक्या थोड्याच ! बालगंधर्व पूर्वजन्मींचे कोणी तरी शापित योगी असावे, असें पूर्वी एका लेखकानें म्हटलें तेंच खरें असावें !

## रत्नाची खाण !

निरनिराळ्या संस्थेला **एक लाखाहून अधिक रक्कम** गंधर्व मंडळीनें दिली ही गोष्ट जगजाहिर आहे. अलीकडे कित्येक वर्षे आठवड्यांतून तीन नाटकें करावयाचीं असें त्यानीं ठरविलें. कारण ज्यास्त मेहनतीमुळें, वयमानामुळें, आवाज बसतो. पण त्याच खेळापैकीं कै० गडकरी व कै० देवल यांच्या स्मारकांकरतां खर्चाकरतां पै देखील न घेतां त्यांनीं स्वयंवर व एकच प्याला असे दोन्हीही मुख्य खेळ १९२९ सालीं दिले !

यवतमाळ येथें एका आंधळ्या भिकाऱ्यास त्याच्या बरोबरच्या मुलांसह उत्तम जेवण घालून २५ रुपये सहज दिले ! दरमहा दहा रुपये पगारदार भुंगे यांचे दुखरे दांत काढण्याकरतां व त्यास एकदां कॉलरा झाला होता, त्यांस बरें करण्याकरतां शेंदीडशें रुपये त्याची हकाकीची स्थिति जाणून दयाळूपणें सहज दिलें ! किर्लोस्कर मंडळींतील पेंटर जुने नोकर गंधर्वमंडळींत होते. ते थकले आहेत, त्यांच्यामागें मुलाबाळांचा खर्च आहे, हें जाणून कित्येक वर्षे कांहीं काम नसतांना जेवणघालून भर पगारी गंधर्व मंडळींत त्यांच्या अंतकालपर्यंत त्यांना ठेवून घेतलें होतें. कै० पंढरपूरकर बुवा ( मुख्य नट ) व कै० पेठकर ( मुख्य नट ) यांच्या कुटुंबासही पोटगी बरेच वर्षे चालू होती; स्वतःच्या जांवयास वीस हजार रुप

विलायतेस शिक्षणास जाण्याकरतां दिलें व मुलीचें–सरोजनीचें लग्न तर १९३० चे सुमारास विलक्षण थाटानें केलें. त्या वेळीं संस्थानिक, सरदार व पुणें शहरांतील मोठमोठे लोक आले होते. त्यावेळच्या अहेराचें प्रदर्शन लग्नमंडपांत पहाण्यास लोकांच्या झुंडीच्या झुंडी येत होत्या ! मोठ्यांचें सर्वच मोठें !

## खरा गुरु कोण ?

बालगंधर्व किर्लोस्कर मंडळींत १९०५–६ सालीं आले. त्यापूर्वी त्यांना लोकमान्य टिळक यांनीं बालगंधर्व ही पदवी दिली; त्या वेळचें त्यांचें तें गाणें मे. महबुबखान यांचेपासून ते शिकलेलें होतें असें अनुमान निघतें; कारण जळगांव येथें त्यांचेच जवळ ते प्रथम गाणें शिकत होते. किर्लोस्कर मंडळींत आल्यावर कै. देवल यांचेकडून फक्त शंकुतलेचेंच काम त्यांना शिकण्यास मिळालें. कारण बाल-गंधर्व किर्लोस्कर मंडळीस लाभले. त्यानंतर सुमारें १-२ महिन्यातच किर्लोस्कर मंडळींचा व कै. देवल यांचा संबंध कायमचाच तुटला. त्यानंतर कै. देवल यांनीं आमरण किर्लोस्कर मंडळींत पाऊल ठेवलें नाहीं. त्या वेळीं गणपतराव बोडस नुकतेच किर्लोस्कर मंडळीच्या रंगभूमीवर शकारप्रतोद, शृंगी ( गुप्तमंजूष ) इ. कामामुळें चमकत होतें. तरी पण गणपतराव देवलांचे पट्टशिष्य होते. त्यांचे जवळ कांहीं कांहीं भूमिका बालगंधर्व शिकत होते असें लेखकांस आठवतें. माना-पमान, विद्याहरण, इ. नाटकें श्री. कृ. प्र. खाडिलकर यांनीं शिकाविलीं. अर्थात् तेही बालगंधर्वांचे गुरुच ! कै. भास्करबुवा व श्री. टेंबे हेही माझे गुरु आहेत असें बालगंधर्व स्वतःच म्हणतात ! बोडस गुरु आहेत असेंही स्वतःच म्हणतात ! गंधर्व मंडळी सुरू झाल्याबरोबर बोडसच तालीममास्तर होते. नंतर कै. देवल हे मृच्छकटिक व संशयकल्लोळ शिकवण्यास आले.

## अप्रत्यक्ष गुरु.

लेखकास किर्लोस्कर मंडळींत रहाण्याचा योग १८९६ ते १९१५ पर्यंत होता. १९११ सालीं एक वर्षभर जमखिंडी संस्थानांत स्टेट फोटोग्राफर म्हणून खास श्रीमंत परशरामभाऊ पटवर्धन ( अधिपती ) यांच्या कृपेनेंच आला होता; परंतु आपले-पणाच्या बोलावण्यावरून लेखकास पुन्हा किर्लोस्कर मंडळींत जाण्याचा योग आला. तेव्हां लेखकास खास सर्व कांहीं गोष्टी सहज पहावयास मिळाल्या. त्यावरून असें वाटतें कीं, बालगंधर्व किर्लोस्कर मंडळींत आल्यापासून कित्येक वर्षें ग्रामोफोन फारच ऐकत होते व सिनेमाही फारच पहात होते. तेव्हां त्यांच्या अभिनयांत

व गाण्यांत नकळत सिनेमा व ग्रामोफोन वगैरेंचा समावेश झाला असावा असें वाटतें !

वरील सर्व गोष्टी खऱ्या जरी असल्या तरी बालगंधर्वांचें गाणें व अभिनय महाराष्ट्राच्या रंगभूमीवर सतत सुमारें ३० वर्षे अव्याहत जें लोकप्रिय झालें आहे, त्याचें मुख्य कारण हेंच असावें कीं, बालगंधर्वांना प्रत्येक प्रवेशाला नवीं नवीं व प्रेक्षकांचें मन आकर्षण करणारीं भारीं भारीं वस्त्रें नेसण्याची जशी हौस आहे, त्याचप्रमाणें प्रत्येक नाटक पुन्हा रंगभूमीवर चालू झालें कीं त्यांचें गाणें व अभिनयही पुष्कळसा नवा नवा व उत्तम आहे असेंच प्रेक्षकांना वाटावें. ही हौस व उत्साह बालगंधर्वांचे ठायीं प्रबळ खरा ! म्हणूनच सतत ३० वर्षे महाराष्ट्र रंगभूमीवरचा त्यांचा पहिला नंबर कोणीही नट हरण करूं शकला नाहीं ! नवा नवा अभिनय नवें नवें गाणें स्वतःच्या ठिकाणीं नित्य सांठवण्याकरितां त्यांनीं खरोखरीच खडतर तपश्चर्या केली आहे. तेव्हां, कुठें नटसम्राट बालगंधर्व या पदास महाराष्ट्रांतील बहुजन रसिकांच्या दृष्टीनें ते पोंचले !

तेव्हां बालगंधर्वांचा खरा गुरु म्हणजे त्यांना नित्य जागे करणारी त्यांची मनोदेवता च असावी असें वाटतें.

## नटांची प्रभावळ कां विसकटली नाहीं !

१९२९ सालीं गंधर्व मंडळींत राहण्याचा योग लेखकास आला होता. नटांचा संच डबल, ट्रिबल त्यामुळें भूमिका ज्याला जी पाहिजे ती मिळणें अशक्य, कारण मंडळींत, अमुक नटाचें काम योग्य होत आहे, हें पारखूनच स्वतःच्या भोंवतालची प्रभावळ ' बालगंधर्वांनीं मोठ्या चातुर्यानें व स्थिर मनानें तयार केली होती. बडोदें मुक्कामीं श्री. भांडारकर आजारी असल्यामुळें " विधिलिखित " नाटकांतलि त्यांचें " सहदेवाचे " कॉमिक काम करण्याचा एकाएकी चॅन्स मला आला. त्यानंतर जळगांव येथेंही तोच चॅन्स आला. नंतर पुणें मुक्कामीं नटवर्य बोडस यांना एकाएकीं मृच्छकटिक नाटकाचे वेळीं ताप आला. त्यांनीं घरूनच रात्रीं ८ वाजतां खेळाचे दिवशीं चिठ्ठी पाठवून कळविलें तेव्हां बालगंधर्व मला एकदम पाहून म्हणाले आज तुम्हीं शकाराचें काम करा तुम्ही शिवराज व यशवंत मंडळींत शकाराचे काम केलें आहे होय ना ? मी होय म्हणतांच रंगण्यास बसा म्हणून सांगितले ! लागलीच दादासाहेब राजहंस

जवळच होते, त्यांना म्हणाले 'आज आपले पांडोबा शकाराचें काम करणार आहेत, तर आईसाहेब यांनाही या म्हणावे.' ते काम मी सतत १४।१५ वर्षें रंगभूमीवर शिवराज व यशवंत वगैरे मंडळींत केलें असल्यामुळें जेथल्या तेथें साहजिकच झालें. दुसरें दिवशीं बालगंधर्व कांहीं मित्रांजवळ म्हणाले 'काल पांडोबांनीं शकाराचे काम आमच्या किर्लोस्कर मंडळीच्या धर्तीवर अगदीं बोड-साच्या धर्तीवर केले !' पण चमत्कार असा कीं, मी जरी गंधर्व मंडळींत, शकार, सहदेव, विकंठ इत्यादि हस्यरसाच्या भूमिका केल्या, त्या भूमिका माझे रंग-भूमीवर चालू असतांना बालगंधर्वही सप्रेम आनंदीत मुद्रेनें वेळोवेळीं प्रेक्षकां-बरोबर हंसत होते. तरी त्या भूमिका अगर तशा कांहीं कायम मिळतील ही कल्पना व्यर्थ. बालगंधर्वांचें कायम वागणुकींत कौतुक करण्यासारखीं एक गोष्ट अपूर्व आहे.ती ही कीं, त्यांच्या भोंवतालची प्रभावळ काडीमात्रही त्यांनीं हलूं दिली नाही. 'बालगंधर्व' रंगभूमीवर असले कीं, प्रेक्षक खुष ! हजार दीडहजार उत्पन्न ज्या ज्या नाटकास व्हावयाचें तें होणारच ! इतर पात्राची बदलाबदल झाली तरी उत्पन्नाचें लेव्हल तेच ! बालगंधर्व जर रंगभूमीवर आजारीपणामुळें नसलें तर त्या दिवशींचें उत्पन्न कल्पनातीत पडावयाचें ! इतकेंच नाहीं तर बालगंधर्वांचा आवाज बसला तर तो दुरूस्त होण्याकरितां महिना महिना सुट्टी, दहा पंधरा हजार रुपये नुकसान सोसून त्यांनीं गंधर्व मंडळीचा २०-२१ वर्षांच्या अवधींत ३-४ वेळा दिली आहे. परंतु 'मी' आहे म्हणून गंधर्व मंडळी सर्वश्रेष्ठ आहे. आमका नट नसतांना अमक्यानीं काम बरे किंवा चांगले केले व पहिल्या नटापेक्षां कमी पगारांत तो आपले कंपनींत राहील ! असल्या भलत्या, क्षुल्लक मोहावर किंवा अहंपणाच्या जोरावर बालगंधर्वांनी आपली जुनी कसलेली नटांची प्रभावळ काडी-मात्र सहसा हलूं दिली नाहीं. ही एकच गोष्ट नाट्यकलेच्या इतिहासांत उदार-पणाची, चातुर्याची आणि पूर्ण निगर्वीपणाची आहे.

## महाराष्ट्र रंगभूमि आणि इंग्लंडची रंगभूमि

बालगंधर्व प्रथम १९०५ सालीं सर्वश्रेष्ठ किर्लोस्कर मंडळींत आले. त्या वेळीं त्यांच्या समागमानें किर्लोस्कर मंडळींत एकदम नवतेज चमकूं लागलें. त्यावेळे-पर्यंत कै. भाऊरावांच्या संगीताचा सांप्रदाय महाराष्ट्र रंगभूमीवर सर्वत्र पसरला होता. परंतु बालगंधर्वांचें पाऊल रंगभूमीवर प्रथम पडल्यापासून महाराष्ट्र रंग-भूमीवर जिकडे तिकडे बालगंधर्वयुग सुरूं झालें अशी बोलवा ऐकूं येऊं लागली.

बालगंधर्वांना ज्या वेळीं गंधर्व नाटक मंडळी सुरू करणें भाग पडलें त्या वेळेपासून आजतागायत महाराष्ट्र रंगभूमीचा त्यांतल्या त्यांत संगीत रंगभुमीचा सर्वश्रेष्ठपणा, बालगंधर्वांच्या गंधर्व मंडळीस लाभला. बालगंधर्व किर्लोस्कर मंडळींतून निघाले तरी कै० अण्णासाहेब किर्लोस्कर भाऊराव कोल्हटकर, मोराबा वाघुलीकर, बाळकोबा नाटेकर, नानासाहेब जोगळेकर इ० नटांना ते देवासमान लेखतात, त्यांच्या तसबिरींचें पूजन गंधर्वमंडळींत नित्य होत असतें. गंधर्व मंडळींचें मुख्य दैवत श्रीशंकर—आणि दुसरें दैवत म्हणजे कै. आण्णासाहेब किर्लोस्कर. गंधर्व मंडळीच्या रंगभुमीवर श्री. टेंबे, श्री. बोडस, श्री. पटवर्धनबुवा, श्री. वालावलकर, श्री. मास्तर कृष्णराव, श्री. रानडे, श्री. भांडारकर, श्री. अभ्यंकर, त्याचप्रमाणें कै० पेटकर, कै. पंढरपुरकरबुवा वगैरे नट अत्यंत तेजानें चमकले ही गोष्ट महाराष्ट्र, कर्नाटक, मध्यप्रांत, वऱ्हाड, गोवाप्रांत इ० प्रांतांतील लाखों लोकांना माहीत आहेत.

बालगंधर्वांनीं सुमारें तीस वर्षे महाराष्ट्र रंगभूमीची सेवा केली. आठवड्यांतून तीन नाटकें असें जरी ढोबळ प्रमाण धरलें तरी एक वर्षांत सुमारें १५० नाटकें होतात. तीस वर्षांत १८०० नाटकें होतात. कॉंग्रेस, प्रदर्शन किंवा ज्या ज्या संस्थानांमध्यें गंधर्व मंडळी जाते, त्या त्या संस्थानांत सरकारी नाटकें बहुधा अधिक करण्याची वहिवाट लक्षांत घेतली तर एकंदर सर्व भूमिका **बालगंधर्वांच्या ३० वर्षांत सुमारें** ५००० झाल्या असें अनुमान निघतें. इतक्या वेळां भूमिका पाहत असतां बालगंधर्व महाराष्ट्र रंगभूमीवर आज तागायत पहिलेच राहिले ही गोष्ट खरोखरीच अपूर्व खरी !

गंधर्व नाटक मंडळीचे नाटककार म्हणजे त्यांचे नाटक सक्सेस होवो अगर फेल्युअर होवो, प्रत्येकास प्रत्येका नाटकाबद्दल ३००० रुपये दिलेच पाहिजेत ! कारण ते गंधर्व मंडळीचे नाटककार आहेत व गंधर्व मंडळी त्यांस किंमत देत आहे असें बालगंधर्वांचें ठाम मत आहे, असें दादा काटदरे मोठ्या अभिमानानें म्हणावयाचे ! सर्व उत्पन्न व सर्व हिशोब क्लिअर ठेवणारे दादांचें तें मत ! काकासाहेब खाडीलकर यांच्या मनाचा मोठेपणा दादा सांगावयाचे. द्रौपदी व मेनका, या नाटकांचे ६०००रुपये तुमचें सर्व कर्ज फिटल्याखेरिज देऊं नका! तें बालगंधर्वांनीं मान्य केलें, पण कर्ज फिटल्यावर दोन नाटकांचे १०००० रुपये काकासाहेबांना बालगंधर्वांनीं दिले असें दादा म्हणाले.

गंधर्व नाटक मंडळीनें १९३०साल अखेर चौतीस लाख रुपये मिळविले,ही गोष्ट जगजाहीर आहे. त्यानंतर चार वर्षांत त्या अनुमानावरून पहातां चार पांच लाख मिळविले असतील असें वाटतें. बालगंधर्वांनीं ३५ ते ४० लाख रुपये मिळविले. परंतु गंधर्व नाटक मंडळीचा बादशाही थाट, ठेवण, व गंधर्व नाटक मंडळीची रंगभूमी, बड्या पगाराचे नट, साथीदार त्याचप्रमाणें भारी भारी सीन सीनरी, लाखों रुपयांची भरजरी वस्त्रें, एखाद्या संस्थानिकासारखीं आपल्या रंगभूमीवर वापरण्यांत त्यांनीं मुख्यतः खर्च केलें, हीच गोष्ट सर्वस्वी स्पष्ट दिसतें. **बालगंधर्वांना जबर व्यसन कोणतें** तर आपल्या रंगभूमीवर लाखों रुपयांचीं भरजरी वस्त्रें, हजारों रुपयांचे सीन आपल्या प्रेक्षकांना दाखविणें, भारी भारी ऑरगन्स, सारंग्या, त्याचप्रमाणें सर्व नोकरांना व इष्टमित्रांना एकाद्या राजासारखें नेहमीं ऐषआरामांत ठेवणें ! उत्तमोत्तम बहुमोल नित्य जेवणाचा, प्रवासाचा थाट ठेवणें वगैरे.—बालगंधर्व स्वतः रूपसुंदर, गंधर्वतुल्य· मधुर गळ्याची ईश्वरदत्त देणगी पूर्वसुकृतानें व पूर्वपुण्याईनें जन्मतःच जरी बरोबर घेऊन आले, तरी स्वकष्टानें संगीत व उच्च अभिनय, मे. महबूबखान कै. भास्करबुवा बखले, श्री. टेंबे, त्याचप्रमाणें कै. देवल श्री. कृ. प्र. खाडीलकर नटवर्य बोडस यांच्या सहाय्यानें त्यांनीं अप्रतीम असा केला. रुक्मिणी, सिंधु, रेवती, शकुंतला, कान्हूपात्रा, मिराबाई, इ. विविध भुमिका गंधर्व रंगभूमीवर त्या त्या भूमिकेशीं, तद्रूप होऊन इतक्या सर्वोत्कृष्ट केल्या कीं, त्या भूमिका गंधर्वतुल्य महाराष्ट्र रंगभूमीवर इतरत्र कोठेंही दिसणें अशक्य ! असेंच सर्वोतोमुखीं ऐकावयास मिळतें ! स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीं कराव्यांत या मतांची नवीन लाट नाट्यप्रेमी व सिनेमाप्रेमी कांहीं प्रेक्षकांत आतां उसळलेली आहे. या पुढें कदाचित् नैसर्गिक सौंदर्यामुळें व नैसर्गिक कोमलतेमुळें, कुणीही मराठी रंगभूमीवर अग्रपूजेचा मान विद्यमान व कलाकुशल नटी अथवा अनेक नट्या मिळवतील ! परंतु ७५ ते ८० वर्षात महाराष्ट्र रंगभूमीवर सर्व प्रकारें तेजानें चमकणारे नटसम्राट् बालगंधर्व एकटेच अग्रपूजेच्या मानास पात्र आहेत. ही गोष्ट महाराष्ट्र रंगभूमीच्या इतिहासांत पहिलीच आहे. म्हणूनच प्रभात फिल्मकंपनीनें बालगंधर्वांस ते ज्या ज्या चित्रपटांत काम करणार त्या त्या चित्रपटास "बाल-गंधर्व प्रभात पिक्चर्स" हें नांव देणाचा व त्या, त्या, चित्रपटाच्या कामागिरीबद्दल भाग देण्याचा अत्यंत मोठा बहुमान दिला आहे.

महाराष्ट्र रंगभूमि आणि इंग्लंडची रंगभूमि ही तुलना कै. दे. भ. शि.म. परांजपे यांनीं २४ व्या नाट्य सम्मेलन प्रसंगीं आपल्या भाषणांत सहज ओघानें केली होती! २४व्या नाट्यसम्मेलनचे अध्यक्ष बालगंधर्व होते. स्वागताध्यक्ष श्री. नामदार जगन्नाथ महाराज होते. त्या वेळीं श्री. एम. एल. ए. आबासाहेब मुजुमदार वक्ते होते. श्री. कमतनुरकर सरदार व आणखी कांहीं वक्ते होते. श्री. जगन्नाथ महाराजांनीं महाराष्ट्र रंगभूमि व इंग्लंडची रंगभूमि या विषयीं मुद्देसूद भाषण केलें. त्यांनीं इंग्लंडची रंगभूमि यावेळीं किती श्रेष्ठ आहे वगैरे निवेदन केलें. बालगंधर्वांनीं त्यावर उत्तरादाखल भाषण करतांना सांगितलें कीं, वैभवसंपन्न इंग्लंडच्या नाटकमंडळ्यांना एका नाटकांस जितकें उत्पन्न होतें, त्यापेक्षां कितीतरी पट कमी उत्पन्न महाराष्ट्रांतील मोठ्या म्हणविणाऱ्या नाटक मंडळाच्या एका नाटकास होतें. तेव्हां सांप्रतच्या, इंग्लंडच्या मोठ्या रंगभूमींची बरोबरी करणें साहाजिकच अशक्य आहे; तरी पण महाराष्ट्रांतील पुष्कळ नाटक मंडळ्यांनीं उत्पन्नाच्या मानानें महाराष्ट्र रंगभूमि सजविली आहे. त्यावर कै. दे.भ. परांजपे भाषण करतांना म्हणाले; बालगंधर्व, कै. विष्णुदास भावे यांच्या वेळेच्या आद्य महाराष्ट्र रंगभूमींत आणि ७५ वर्षांच्या नंतरचा गंधर्व मंडळीच्या रंगभूमींत बालगंधर्व तुम्ही महाराष्ट्र रंगभूमि आणि इंग्लंडची रंगभूमि इतकें महत् अंतर तुम्ही आपल्या गुणांनीं, स्वकष्टांनीं आपल्या हयातींत करून दाखविलेंत, ही गोष्ट खरोखरीच महाराष्ट्रास भुषणावह आहे. कै. शि. म. परांजपे यांच्या एका वाक्यांत बालगंधर्वांच्या यशाचें सार आहे. एका प्रवेशांतला कपडा दुसऱ्या प्रवेशांत वापरायची नाहीं, त्याचप्रमाणें या वर्षींच्या अभिनयापेक्षां व संगीतापेक्षां दुसऱ्या वर्षी आपल्या प्रेक्षकांस नवें कौशल्य दाखवावयाचें! खऱ्या भरजरी कपड्याबरोबर भव्य सिनसिनरी प्रतिवर्षी नवी दाखवावयाची या सर्व गोष्टी साधण्याकरितां संपूर्ण आयुष्यांत लक्षावधि रुपये मिळवून सुद्धां स्वतः करतां अल्पसें एखादें 'घर' अगर अल्पसें बिघाभर 'शेत' सुद्धां ज्यांनीं केलें नाहीं ते पूर्ण निःस्वार्थी नटसम्राट बालगंधर्व! महाराष्ट्र रंगभूमीच्या इतिहासांत खरोखरीच अमर आहेत. श्री रंगदेवतारूपी परमेश्वर नटसम्राट बालगंधर्वांना

दीर्घायु करो ! " बालगंधर्व प्रभात पिक्चर्स " मध्यें रूपांतर होणाऱ्या बालगंधर्वांना चित्रभूमीवरही असेंच पूर्ण यश देवो व चिरकाल त्यांना सहकुटुंब पुढील आयुष्यांत सुखी ठेवो, हेंच मागणें दयाळू परमेश्वराजवळ बालगंधर्वप्रेमी जनता मागणार ! आणि जनताजनार्दन ती मागणी पूर्ण करणार, यांत कांहीं एक संदेह नाहीं !

श्रीरंगदेवतार्पणमस्तु.

पुण्यांतील व परगांवाहून पुण्यास येणाऱ्या
उपहाराची योग्य व्यवस्था फक्त
खाडीलकर यांचें

# मनोहर विश्रांति गृह

येथेंच होते. आमचेकडे उपहाराशिवाय इतर प्रकारची पेयें, बिस्किटें, पेपरमिंटस्, वगैरे माल मिळतो. त्याचप्रमाणें स्वच्छते-कडे विशेष लक्ष दिलें जातें. तरी लोकांनीं याचा फायदा घ्यावा.

| मुख्य दुकान<br>लक्ष्मी रोड | शाखा.<br>दत्त मंदिराजवळ,<br>पेठ--शुक्रवार पुणें--शहर. |
|---|---|

---

फोटो काढण्याचें उत्तम ठिकाण !

# बी. जी. पारगे आणि कं.

फोटो आर्टिस्टस्

बाहुलीचे हौदाशेजारीं

पेठ—बुधवार पूना नं. २ पुणें शहर

अनेक प्रकारचे

# हार्मोनियम्स् ग्रामोफोन

व

# रेकॉर्ड्स

माफक भावानें विकत मिळतात.

आप्पा बळवंत चौक, शनवार पुणें २

# वसंत आणि कंपनी












विठ्ठल मंदिराजवळ, बुधवार ४६० पुणें. २

प्रायमस स्टोव्ह, पेट्रोम्याक्स बत्त्या, जाव्हा स्पिरिट, अमेरिकन केरोसिन, फीनाईल टाटा साबण वगैरे मिळेल.



श्रीयुत कृष्णाप्पा उर्फ देवाप्पा.



श्रीयुत पांडोबा गणेश क्षीरसागर.

श्री. डॉ. भडकमकर. डॉ. सोमण वगैरेंचा मी आभारी आहे.( **क्षीरसागर**


## कुलीन स्त्रिया विरुद्ध रंगभूमि ( किं. ॥८ )

**लेखक—शंकर बापूजी मुजुमदार**

या विषयावर हें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे
व २७ व्या नाट्यसंमेलनांत या विषयावर उहापोह होऊन
**कुलीनस्त्रियांनीं रंगभूमीवर प्रवेश**
**न करण्याबद्दल एकमत** झालें आहे.

इंग्लंडांतील प्रसिद्ध नट ] **ग्यारिक** [ यांचें चरित्र किं. १ रु.

लायब्ररीच्या व शाळा यांकरितां विद्याखात्यानें मंजूर केलें आहे.
दोन्हीं पुस्तकें एकदम मागविणारास ट. ह. शिवाय १। रु.

**कसबा १९९ पुणें लक्ष्मीनारायण प्रेस.**

## आमचें सतत ६० वर्षें प्रसिद्ध आसलेले जुनें एकच दुकान

**कै. नारायण तात्याबा गुरव केंदूरकर.**



आमच्या खास कारखान्यांत व स्वतःचे देखरेखीखालीं तयार झालेला माल घ्या आणि खुष व्हा.

गंधर्व नाटक मंडळी व इतर मोठ्या मोठ्या नाटक कंपन्या, तसेंच महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध गवई, सुप्रसिद्ध तबला व मृदुंगवादनपटू तसेंच उच्च भजनी मंडळी आमच्याच कडून तबले डग्गे मृदंग वगैरे वाद्यें खरेदी करितात व दुरुस्त करून घेतात. तेव्हां इतकेंच ध्यानांत ठेवा; व अगोदर खालील पत्त्यावर त्वरीत मागणी करा. विशेष माहितीकरितां दोन आण्याची पोस्टाची तिकिटें पाठवून आमचा सचित्र क्यॅटलाग मागवा.

पत्ता- **विष्णु विठोबा गुरव**-शिक्रापूरकर, ठि॥ शुक्रवार, ७६१ पुणें.